# नवभारत

वर्ष १० वें ] ऑगस्ट १९५७ [ अंक ११



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका











नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






अनुक्रमणिका






सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष दहावें
अंक अकरावा

# नवभारत

ऑगस्ट
१९५७

संपादक-मंडळ
आचार्य स. ज. भागवत-श्री. हरि कृष्ण मोहनी-प्रा. वि. म. बेडेकर
प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
४४६ शीव रोड, मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि. सातारा )

# 'नवभारत' मासिक, ऑगस्ट १९५७

## — लेखक-परिचय —

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय, या अंकांतील इतर लेखकांचा परिचय या वर्षी यापूर्वी त्यांचे लेख आले त्या वेळीं दिला आहे.—— का. सं. ]

**प्रा. गो. चिं. सुर्वे :** मुंबई येथील सिद्धार्थ कॉमर्स कॉलेजांतील अर्थशास्त्राचे प्राध्यापक.

**श्री. सुभाषचंद्र अक्कोळे :** सोलापूर येथील संगमेश्वर कॉलेजांतील माजी प्राध्यापक, 'सन्मति' मासिकाचे संपादक.

**श्री. स. वा. कुलकर्णी :** आय्. ए. एस्. मधील अधिकारी.

**प्रा. प्र. चिं. शेजवलकर :** पुणें येथील बृ. म. कॉमर्स कॉलेजांतील अर्थशास्त्राचे प्राध्यापक; नियतकालिकांतून आर्थिक प्रश्नासंबंधीं स्फुट लेखन.

**प्रा. रा. द. गोडबोले :** मुंबई येथील रामनारायण रुइया कॉलेजांतील पदार्थविज्ञानशास्त्राचे प्राध्यापक व विभागप्रमुख.

**प्रा. दि. धों. कर्वे :** पुणें येथील फर्ग्यूसन कॉलेजचे प्राचार्य; रसायनशास्त्राचे प्राध्यापक; प्रसिद्ध शिक्षणशास्त्रज्ञ.

---

## पोंच

**मराठी-गुजराती शिक्षक** – एन्. जी. मेहता; नैकात्मा प्रकाशन, पंचवटी, नाशिक, किं. १ रु.

**गीत-लकेरी** – गिरीबाल; केसर प्रकाशन, हैद्राबाद, किं. आठ आणे.

**वृत्तपत्रव्यवसाय** – रमेश मंत्री, मौनी विद्यापीठ, गारगोटी, कोल्हापूर, किं. ३॥ रु.

**श्री. समर्थांचा उजवा हात** – द. आ. तानवडे, के. भि. ढवळे, मुंबई ४, किं. ७५ नये पैसे.

**आपण आपले थोर पुरुष होणार** – गंगाधर गाडगीळ, के. भि. ढवळे, मुंबई ४, किं. ७५ नये पैसे.

**राजा शिवाजी** – रियासतकार गो. स. सरदेसाई, के. भि. ढवळे, मुंबई ४, किं. २ रु.

**खेळगडी** – वर्ष २४ अंक १; मे १९५७, के. भि. ढवळे, मुंबई ४, किंमत ५० नये पैसे.

**संयुक्त महाराष्ट्राची समस्या** – ह. रा. महाजनी, के. भि. ढवळे, मुंबई ४, किं. ३ रु.

**आर्य संस्कृति** – श्री. श्रीधर स्वामी, प्रका. श्री. दत्ताबुवा रामदासी, परळी.

**समूहाचें मानसशास्त्र** – श्री. रा. द. दामले, आनंद प्रकाशन, यवतमाळ.






प्रा. वा. वि. मिराशी

# हूणविजेता यशोधर्मन्-विष्णुवर्धन

स्थाणोरन्यत्र येन प्रणतिकृपणतां
प्रापितं नोत्तमाङ्गं
यस्याश्लिष्टो भुजाभ्यां वहति हिमगिरि-
र्दुर्गशब्दाभिमानम् ।
नीचैस्तेनापि यस्य प्रणतिभुजबला
वर्जनक्लिष्टमूर्ध्ना
चूडापुष्पोपहारैर्मिहिरकुलनृपे-
णार्चितं पादयुग्मम् ॥

— मन्दसोरचा स्तम्भलेख[1]

मध्यप्रदेशांत उज्जयिनीच्या वायव्येस सुमारें ७५ मैलांवर मन्दसोर नामक एक प्राचीन नगर आहे. त्याचें मूळचें नांव दशपुर. कदाचित् दहा लहान लहान पुरें किंवा गांवें मिळून तें बनलें असेल. प्राचीन काळीं हें नगर सुविख्यात होतें. नाशिक लेण्यांतील ऋषभदत्ताच्या खिस्तोत्तर द्वितीय शतकांतील लेखांत याचा निर्देश आला आहे. मन्दसोर येथें सांपडलेली भगवान् शंकराची गुप्तकालीन सुंदर मूर्ति आणि उत्कृष्ट कोरीव काम केलेलें दगडी तोरण हीं त्या नगराच्या प्राचीन वैभवाची व कलाभिज्ञतेची साक्ष देतात. कालिदासानें तेथील स्त्रियांच्या सौंदर्याचें सुंदर वर्णन मेघदूतांतील खालील श्लोकांत केलें आहे.

तामुत्तीर्य[2] व्रजपरिचितभ्रूलताविभ्रमाणां
पक्ष्मोत्क्षेपादुपरिविलसत्कृष्णशारप्रभाणाम् ।
कुन्दक्षेपानुगमधुकरश्रीमुषामात्मबिम्बं
पात्रीकुर्वन् दशपुरवधूनेत्रकौतूहलानाम् ॥

मेघदूत, श्लो. ४९.

गुप्त कालांत हें नगर अत्यंत भरभराटींत होतें. त्याचें वर्णन तेथें सापडलेल्या मालव ( म्हणजे विक्रम ) संवत्[3] ५२९ ( सन ४७३–७४ ) च्या शिलालेखांत आलें आहे. मदोन्मत्त हत्तींच्या गंडस्थलांतून स्रवणाऱ्या मदबिंदूंनीं ओले झालेले खडक, कमलांनीं सुशोभित झालेलीं व हंसांनीं भरलेलीं सरोवरें, पुष्पभारांनी लवलेले वृक्ष, मत्त मधुकरांचे गुंजारव व सदोदित जात-येत असलेल्या पुरस्त्रिया यांनी सुशोभित झालेलीं उपवनें, उत्तुंग व रम्य प्रासाद इत्यादिकांचें सुंदर वर्णन वत्सभट्टि नामक कवीनें त्या शिलालेखांत केलें आहे. त्या वर्णनांत कालिदासाच्या मेघदूतांतील शब्दार्थांचें अनुकरण स्पष्ट दिसत असल्यानें कालिदासाच्या कालाची अपरमर्यादा ठरविण्यास त्या लेखाचा उपयोग होतो. असो.

१ फ्लीट– गुप्त नृपतींचे कोरीव लेख ( कॉर्पस् इन्स्क्रिप्शनम् इंडिकेरम्, पु. ३ ), पृ. १४६–४७

२ त्या सिंधु नदीला ओलांडून. ही नदी माळव्यांतील होय.

३ या संवतालाच पुढें दहाव्या शतकांत ' विक्रमसंवत् ' असें नांव प्राप्त झालें. याच्या आरंभींच्या अनेक लेखांत याचें ' कृत ' असें नांव येतें. तसेंच या संवताची कालगणना मालव गणाच्या पद्धतीनुसार केली आहे असेंहि म्हटलेलें असतें. मालव संवतांतून ५६–५७ वजा केले म्हणजे इ. स. चें वर्ष येतें.



अनुक्रमणिका








## मन्दसोरचे प्राचीन अवशेष

पण मन्दसोर येथें प्राचीन कालचे अत्यन्त महत्त्वाचे असे अवशेष कोणते असें विचारल्यास त्या नगरापासून आग्नेयेस सुमारें तीन मैलांवर असलेल्या सोंदणी गांवाच्या दोन शिलास्तंभाकडे अंगुलिनिर्देश करावा लागेल. या स्तंभांचे तुकडे पूर्वी शेतांत इतस्ततः पडले होते, ते आंता एका प्लॅटफॉर्मवर जुळवून ठेवले आहेत. जवळच खणलें तेव्हां ज्या पीठांवर ते उभारले होते त्यांचे अवशेष आढळले. प्रत्येक स्तंभ एकसंधि असून त्याची मूळची उंची चाळीस फूट होती. हे स्तंभ खालीं चौकोनी व वर षोडशकोनी असून त्यावर कमलाकृति शीर्षक व सर्वांच्या वर सिंहाची आकृति होती. प्रत्येक स्तंभ अखंड होता तेव्हां त्याचें वजन निदान दोनशें टन असावें. अशा तऱ्हेचा दगड जवळपास शंभर सवाशें मैलांच्या परिसरांत आढळत नाहीं. तेव्हां प्राचीन काळीं हल्लीच्या सारखी यांत्रिक साधनांची अनुकूलता नसतांहि अशा भारी वजनाचे हे शिलास्तंभ इतके दूर कसे आणले गेले असतील याबद्दल आश्चर्य वाटल्याशिवाय राहत नाहीं.

## यशोधर्म्याचे विजयस्तंभ

हे दोन्ही स्तंभ विजयस्तंभ असून ते यशोधर्मन् नामक राजानें मिहिरकुल नांवाच्या हूण राजावर मिळविलेल्या विजयाचें द्योतक म्हणून उभारले होते असें त्यांवरील लेखांवरून दिसतें. दोन्ही स्तंभांवर तोच लेख कोरला होता, पण आतां तो एका स्तंभावर मात्र पूर्ण स्थितींत आहे. दुसऱ्या स्तंभावरील लेख आतां त्रुटित झाला आहे. हा लेख पद्यमय असून त्याचे एकंदर नऊ श्लोक आहेत. आरंभींच्या श्लोकांत भगवान् शंकराच्या वृषांकित ध्वजाचें वर्णन असून तो ध्वज तुमच्या शत्रूंचा तेजोनाश करो अशी प्रार्थना केली आहे. यानंतरच्या एका श्लोकांत, सर्व पृथिवी पादाक्रान्त करण्यामध्यें ज्यांचा पराक्रम दिसून आला होता अशा गुप्त नृपतींनीहि ज्या देशांचा उपभोग घेतला नव्हता आणि ज्या देशांमध्यें नृपतींच्या मुकुटांवर आरूढ होणारी हूणाधिपतींची आज्ञा प्रवेश करूं शकली नव्हती, त्या सर्व देशांचें संरक्षण यशोधर्मा आपल्या घराच्या परड्याप्रमाणें लीलेनें करतो, असें म्हटलें आहे. या वर्णनावरून यशोधर्म्याच्या विशाल साम्राज्याची कल्पना येते. उत्तर हिंदुस्थानचा बहुतेक भाग गुप्त साम्राज्यांत अन्तर्भूत होता. तथापि त्यांच्या अमलाखालीं काश्मीरादि कांही उत्तरेचे प्रदेश आल्याबद्दल प्रमाण नाहीं. याच्या उलट हूण नृपति मिहिरकुल हा पंजाबांत शाकल ( सध्याचें सियालकोट ) येथून राज्य करीत होता. त्यानें काश्मीरचें राज्यहि गिळंकृत केलें होतें असें ह्यूएनत्संग सांगतो. यशोधर्म्याचें राज्य गुप्त व हूण नृपतींच्या राज्यांपेक्षा मोठें होतें असें प्रस्तुत लेखांत म्हटलें असल्यामुळें त्यामध्यें हा सर्व प्रदेश अन्तर्भूत झाला होता यांत संशय नाहीं. याविषयी स्पष्ट निर्देश याच स्तंभलेखांतील पुढील श्लोकांत आला आहे—

आ लौहित्योपकण्ठात्तलवनगहनो
पत्यकादा महेन्द्रात्
आ गङ्गाश्लिष्टसानोस्तुहिनशिखरिणः
पश्चिमादा पयोधेः ।
सामन्तैर्यस्य बाहुद्रविणहृतमदैः
पादयोरानमद्भिः
चूडारत्नांशुराजिव्यतिकरशबला
भूमिभागाः क्रियन्ते ॥

[ ( उत्तरेस ) ब्रह्मपुत्रा नदीपासून ( दक्षिणेस ) ज्याच्या पायथ्याशीं तालवृक्षांचीं वनें आहेत अशा ( कलिंग देशांतील ) महेन्द्र पर्वतापर्यंत, तसेंच ज्याच्या शिखरांना गंगानदीनें वेष्टिलें आहे त्या हिमालय पर्वतापासून तों पश्चिम सागरापर्यंत, पसरलेल्या देशांचें सामन्त नृपति या यशोधर्मसम्राटाच्या बाहुबलानें हतगर्व होऊन, त्याच्या चरणांना नमस्कार करीत असतां त्याच्या पुढील भूमीला








आपल्या मुकुटांतील ( विविध ) रत्नांच्या किरणांनीं चित्रविचित्र करतात. ]

त्यानंतर यशोधर्म्याच्या ज्या विजयाचें स्मारक म्हणून हे स्तम्भ उभारले होते त्याचें वर्णन प्रस्तुत लेखाच्या आरंभीं उद्धृत केलेल्या श्लोकांत केलें आहे. त्यांत म्हटलें आहे कीं, ज्यानें भगवान् शंकराखेरीज इतर कोणाहि पुढें आपलें मस्तक नमविलें नव्हतें, आणि ज्याच्या बाहूंनी वेष्टिल्यामुळें हिमालय पर्वत आपण दुर्गम आहों अशी बढाई मारूं शकत नाहीं, अशा मिहिरकुल नृपतीलाहि यशोधर्म्याच्या बाहुबलामुळें कष्टानें मान वांकविणें भाग पडलें, आणि त्यानें आपल्या मस्तकावर धारण केलेल्या पुष्पमालांनीं त्याच्या ( यशोधर्म्याच्या ) दोन्ही चरणांचें पूजन केलें.

### विजयाचें महत्त्व

भारतीय इतिहासांत यशोधर्म्याच्या या विजयाचें अत्यंत महत्त्व आहे. ज्या हूणांच्या अधिपतींवर यशोधर्म्यानें हा विजय मिळविला होता ते जागतिक इतिहासांत अत्यंत क्रूर व रानटी म्हणून प्रसिद्ध आहेत. ते जो प्रदेश आक्रमीत त्याला लुटून व जाळून बेचिराख करीत. त्यांच्या एका टोळीनें युरोपांत दूरवर स्वाऱ्या करून रोमन साम्राज्य नष्ट केलें. त्यांचा नायक ॲट्टिला याला Scourge of God ( परमेश्वरी उत्पात ) असें म्हणत. त्यांच्याच एका श्वेतहूण नामक टोळीनें इराणवर स्वारी करून तेथील राजाला कंठस्नान घातलें. दुसऱ्या एका टोळीनें भारतावर गुप्त नृपति स्कन्दगुप्त याच्या कारकीर्दीच्या आरंभीं आक्रमण केलें. स्कन्दगुप्तानें या टोळधाडीचा मोठ्या शौर्यानें प्रतिकार केला. या युद्धकालांत एकदां तर त्याला नुसत्या जमिनीवर पडून रात्र घालवावी लागली होती.[४] आपल्या शत्रूवर मोठ्या शौर्यानें प्राप्त झालेला विजय त्यानें आपल्या मातेला कळविला तेव्हां तिचे नेत्र आनंदाश्रूंनीं भरून आले असें एका कोरीव लेखांत म्हटलें आहे. कवीनें या ठिकाणीं कंसवधानंतर कृष्ण देवकीला भेटावयास गेला त्या प्रसंगाची हृदयस्पर्शी उपमा दिली आहे.[५] हूणांशीं स्कन्दगुप्तानें केलेल्या भयंकर रणकंदनानें सर्व पृथ्वी कंपित झाली, असेंहि त्या लेखांत म्हटलें आहे,[६] त्यावरून त्या घनघोर संग्रामाची कल्पना येईल. या खेपेस स्कन्दगुप्तानें भारतास हूणांच्या टोळधाडीपासून बचावलें तरी त्याच्या निधनानंतर ( सन ४६७ ) हूणांनी पुनः आक्रमण करून उत्तर भारताचा बराचसा भाग काबीज केला. सागर जिल्ह्यांतील एरण या गांवीं तोरमाण नामक हूण नृपतीच्या धन्यविष्णु नांवाच्या सामन्ताचा लेख सांपडला आहे. त्यांत कालनिर्देश नाहीं, पण तेथील इतर लेखांवरून तोरमाणानें तो प्रदेश सन ४८४–८५ नंतर लौकरच, बहुधा सन ४९०च्या सुमारास जिंकला असावा. तोरमाणाचा पुत्र मिहिरकुल याच्या कारकीर्दीच्या पंधराव्या वर्षी कोरलेला लेख ग्वाल्हेरच्या किल्ल्यांत सांपडला आहे. त्याची राजधानी पंजाबांत शाकल येथें होती तसेंच

४ विचलितकुललक्ष्मीस्तम्भनायोद्यतेन
क्षितितलशयनीये येन नीता त्रियामा ।
भिटारी शिलालेख, कॉ. इ. इं., पु. ३, पृ. ५३

५ जितमिति परितोषान्मातरं सास्रनेत्रां
हतरिपुरिव कृष्णो देवकीमभ्युपेतः ॥
पूर्वोक्त, पृ. ५३.

६ हूणैर्यस्य समागतस्य समरे दोर्भ्यां धरा कम्पिता ।
पूर्वोक्त, पृ. ५३.










त्याचा अंमल काश्मीर येथेंहि चालत होता हें मागें सांगितलें आहेच. राजतरंगिणींतहि तोरमाण व मिहिरकुल यांचीं नांवें आलीं आहेत. पण तोरमाण मिहिरकुलानंतर अठरा राजांनीं राज्य केल्यावर झाला असें कल्हण सांगतो. त्यावरून त्यास त्यांच्या विषयीं निश्चित माहिती होती असें वाटत नाहीं.

मिहिरकुल हा अत्यंत रागीट व क्रूर होता. कल्हणानें त्याला कृतान्ताची उपमा दिली आहे. त्याचे सामन्त त्याच्या पुढे चळचळां कापत असत, असें ह्यूएनत्संग सांगतो. तो स्वत: भगवान् शंकराचा उपासक होता. त्याच्या नाण्यांवर नन्दीची आकृति असून ' जयतु वृष: ' ( नंदीचा विजय असो ) असा लेख आढळतो. त्यानें हिंदुधर्मीयांना कदाचित् त्रास दिला नसेल, पण बौद्धधर्मीयांचा अनन्वित छळ केला यांत संशय नाहीं. त्यानें पुरुषपुर ( पेशावर ) येथील बुद्धाचें भिक्षापात्र भग्न केलें होतें. कांहीं कारणानें त्याचा बौद्ध भिक्षूंवर रोष झाल्यामुळें त्यानें बौद्ध धर्माचीं पाळेंमुळें खणून काढण्याचा निश्चय केला. त्यानें आपल्या राज्यांतील १६०० स्तूप व विहार जमीनदोस्त केले आणि नऊ कोटी बौद्धधर्मीयांना कंठस्नान घातलें असें ह्यूएनत्संग सांगतो. या वृत्तांतात अतिशयोक्ति उघड दिसते; तथापि त्यावरून मिहिरकुलाचा रागीट स्वभाव व क्रूरपणा व्यक्त होतो.

## मर्यादित उपलब्ध माहिती

रानटी, क्रूर व प्रजेला छळणाऱ्या या मिहिरकुलाच्या मगरमिठींतून भारताला सोडविणाऱ्या यशोधर्म्याबद्दल फारच थोडी माहिती उपलब्ध आहे. सबंध संस्कृत वाङ्मयांत त्याचें नांव कोठेंहि येत नाहीं. त्याच्या काळचे दोनच कोरीव लेख सांपडले आहेत. त्यांपैकीं एकाची माहिती वर दिली आहे. दुसरा लेख मन्दसोर येथेंच एका विहाराला लावलेल्या शिलेवर कोरलेला सांपडला आहे. त्यामध्यें यशोधर्म्याचें विष्णुवर्धन असें दुसरें नांव[७] आणि त्याच्या ' राजाधिराज ' व ' परमेश्वर ' अशा सम्राट्पदनिदर्शक पदव्या यांचा उल्लेख आहे. या दुसऱ्या लेखाचा उद्देश दशपुर येथें राजस्थानीय ( राजप्रतिनिधि ) म्हणून अंमल चालविणाऱ्या निर्दोष नामक ' नैगम ' वंशी अधिकाऱ्यानें आपल्या अभयदत्त नांवाच्या चुलत्याच्या नांवें एक विहीर खणली हें जाहीर करण्याचा होता. या लेखांतील आरंभींच्या वर्णनावरून यशोधर्म्याच्या वंशाचें नांव ' औलिकर ' होतें असें समजतें. या लेखांत मालव संवत् ५८९ ( सन ५३३–३४ ) चा उल्लेख आहे. मन्दसोरच्या या दोन्ही लेखांचा कोरक्या गोविंद हाच होता. त्यावरून यशोधर्म्याचा हूण नृपति मिहिरकुलावरील विजय सन ५३३–३४च्या जवळपास घडून आला असें मानण्यास हरकत नाहीं.

यशोधर्म्याविषयीं कोरीव लेखांतून माहिती मिळते ती एवढीच. मन्दसोरच्या स्तंभलेखांत ' श्लाघ्येजन्माऽस्यवंशे ' ( याचा जन्म प्रशंसनीय कुलांत झाला आहे ) असें म्हटलें आहे. पण त्याच्या औलिकर कुलाविषयीं कांहींच माहिती उपलब्ध नव्हती. त्यामुळें एखाद्या धूमकेतूप्रमाणें यशोधर्म्याचा उदय भारतांत झाला असें मानण्यांत येत असे. तसेंच त्याचे विजयस्तंभ मन्दसोरजवळच्या गांवीं सांपडल्यामुळें तो दशपुर येथें राज्य करीत होता असेंहि समजलें जात असे. अलीकडे प्रसिद्ध झालेल्या कांहीं कोरीव लेखांवरून व इतर साधनांवरून यशोधर्म्याविषयीं कोणती नवी माहिती मिळते हें प्रस्तुत लेखांत पाहावयाचें आहे.

## माळव्यांतील अलिकडे सांपडलेला शिलालेख

यशोधर्म्याच्या औलिकरवंशाचा उल्लेख मागें आला आहे. या वंशाचें नांव इतरत्र कोठें आलें

७ या लेखाचें संपादन करीत असता फ्लीटनें यशोधर्मन् हा विष्णुवर्धनाहून भिन्न होता असें म्हटलें होतें, पण तें चूक आहे.










नव्हतें, पण सन १९३८ मध्यें माळव्यांतील विहारकोत्रा गांवीं (मालव) संवत् ४७४ चा महाराज नरवर्मन् नामक नृपतीचा एक शिलालेख सांपडला.[८] त्यामध्यें 'श्रीमहाराजनरवर्मण: औलिकरस्य राज्य-संवत्सरे' असा उल्लेख आढळला. या नरवर्म्याच्या वंशजांचे कांहीं लेख मंदसोरच्या सभोंवारच्या प्रदेशांत सांपडले आहेत. त्यावरून हें घराणें मंदसोरला बराच काळ राज्य करीत होतें असें दिसतें. आतांपर्यंत सांपडलेल्या या वंशाच्या लेखां-वरून खालील वंशावळ ज्ञात झाली आहे. ( ज्ञात वर्षें कंसांत दिलीं आहेत ).

जयवर्मन्
|
सिंहवर्मन्
|
नरवर्मन् ( मालव संवत् ४६१ व ४७४ )
|
विश्ववर्मन् ( मा. सं. ४८० )
|
बंधुवर्मन् ( मा. सं. ४९३ )
:
यशोधर्मन् – विष्णुवर्धन ( मा. सं. ५८९ )

बन्धुवर्मन् हा गुप्तनृपति प्रथम कुमारगुप्त ( सन ४१३ ते ४५५ ) याचा मांडलिक म्हणून दशपुर येथें राज्य करीत होता हें वत्सभट्टीच्या मालव संवत् ५२९ च्या शिलालेखावरून समजतें.[९] त्याचे पूर्वज नरवर्मन् व विश्ववर्मन् यांच्या लेखांत मात्र गुप्त सम्राटांचा नामनिर्देश नाहीं. तसेंच या सर्व राजांच्या कोरीव लेखांत मालव ( विक्रम ) संवता-चाच उपयोग कालनिर्देशाकरितां केला आहे. तत्कालीन गुप्त सम्राटांच्या इतर मांडलिकांच्या लेखांत याहून भिन्न परिस्थिति दृष्टीस पडते. त्यांच्या लेखांत गुप्त सम्राटांची वंशावळ किंवा निदान तत्कालीन सम्राटाचें नांव दिलेलें असतें. तसेंच त्यांत गुप्त संवताचाच उपयोग केलेला असतो. तेव्हां या बाबतींत गुप्त सम्राट् विशेष आग्रह धरीत असें दिसतें. असें असतांहि या औलिकर वंशाच्या अनेक लेखांत गुप्त सम्राटांचा किंवा गुप्त संवताचा निर्देश नाहीं. त्यावरून हें घराणें दशपुर येथें दृढमूल झालें असून बरेंच प्रबळ होतें, असें अनुमान करण्यांस हरकत नाहीं.

बन्धुवर्म्यानंतर यशोधर्म्यापर्यंतच्या सुमारें शंभर वर्षांच्या काळांत दशपुर येथें कोण राजे राज्य करीत होते याविषयीं माहिती आपणांस नव्हती. वत्सभट्टीच्या मालव संवत् ५२९ च्या लेखांत मालव संवत् ४९३ पासून ५२९ पर्यंतच्या केवळ छत्तीस वर्षांच्या अल्प काळांत दशपुर येथें अनेक राजे होऊन गेले व तेथें मा. सं ४९३ मध्यें बांधलेलें सूर्याचें मंदिर इतकें विशीर्ण झालें कीं त्याचा जीर्णोद्धार करावा लागला, असें म्हटलें आहे.[१०] या लेखांतील वर्णनावरून तत्कालीन अस्थिर परिस्थिति अजमावतां येते. मालव संवत् ५२४ चा आणखी एक लेख अलीकडे मंदसोरला सांपडला आहे.[११] त्यांत प्रभाकर नामक नृपतीनें गुप्तांच्या शत्रूंचा पाडाव केला असें म्हटलें आहे. हा प्रभाकर बहुधा औलिकरवंशी असावा. त्यानें

---

८ एपिग्राफिया इंडिका, पु. २६, पृ. १३१.

९ कॉ. इ. इं., पु. ३, पृ. ७९ इ.

१० बहुना समतीतेन कालेनान्यैश्च पार्थिवैः ।
व्यशीर्यतैकदेशोऽस्य भवनस्य ततोऽधुना ॥
पूर्वोक्त, पृ. ८३

११ ए. इं., पु. २७, पृ. १४५ इ.



अनुक्रमणिका





पराजित केलेले गुप्तांचे शत्रू कोण होते याचा निर्देश मात्र त्या लेखांत आला नाहीं. तथापि ते हूणच असावे, असें वाटतें.

## आणखी कांहीं पुरावा

प्रभाकरानंतर दशपुर येथील राजकीय परिस्थितीवर प्रकाश पाडणारे दोन शिलालेख नुकतेच एपिग्राफिया इंडिकांत[१२] डॉ. दिनेशचंद्र सरकार यांनी प्रकाशित केले आहेत. त्यांपैकीं एक मंदसोरच्या उत्तरेस पंचवीस मैलांवरच्या नीमच स्टेशनजवळ छोटी सादडी नामक गांवांत सांपडला होता. त्या लेखाचा उद्देश मानवायनि कुलांतील महाराज गौरि यानें त्या गांवीं देवीचें देवालय बांधलें हें जाहीर करण्याचा होता. या लेखांत महाराज गौरीची वंशावळ खालीं दिल्याप्रमाणें दिली आहे—

पुण्यसोम
|
राज्यवर्धन
|
राष्ट्र ( अर्थात् राष्ट्रवर्धन )
|
यशोगुप्त
|
महाराज गौरि

या लेखाचा काल ( मालव ) संवत् ५४७ असा आहे. याच महाराज गौरीचा दुसरा लेख मन्दसोर येथें सांपडला आहे. तो खंडित झाला आहे तरी त्यापासून कांहीं महत्त्वाची माहिती मिळते. लेखाच्या आरंभी मंगलश्लोकानंतर आदित्यवर्धन नामक राजाचें वर्णन आलें आहे. त्यांत त्यानें आपल्या शत्रूवर विजय मिळविल्याचा उल्लेख आहे. हा राजा राज्य करीत असतां ( नरध्याघ्रे नरेन्द्रादित्यवर्धने ) मानवायनिवंशी महाराज गौरीनें दशपुर येथें आपल्या मृत मातेच्या पुण्योपार्जनाकरितां एक तलाव खोदला, असें म्हटलें आहे. या लेखांत महाराज गौरीची वंशावळ खालीलप्रमाणें दिली आहे—

राष्ट्रवर्धन
|
यशोगुप्त
|
महाराज गौरि

ही वंशावळ छोटी सादडी येथील लेखांतल्या प्रमाणेंच आहे. पण या लेखाच्या आरंभीं ज्या आदित्यवर्धन नामक नरेन्द्राचा उल्लेख आला आहे त्याचा आणि महाराज गौरीचा कसा संबंध होता हें या शिलालेखावरून स्पष्ट नाहीं. प्राचीन काळीं मांडलिक राजांच्या लेखांच्या आरंभी तत्कालीन सम्राटाच्या नांवाचा उल्लेख करण्याची पद्धत होती.[१३] तेव्हां आदित्यवर्धन हा महाराज गौरीचा सम्राट् असावा. डॉ. सरकार यांनीं आदित्यवर्धन हें महाराज गौरीचें दुसरें नांव असावें असा एक पक्ष मांडला आहे. पण तसें असतें तर त्या नांवाचा उल्लेख छोटी सादडीच्या अखंडित लेखांत आला असता. तसेंच, हा आदित्यवर्धन दशपुर येथें राज्य करीत असावा व महाराज गौरीनें दशपुर येथें ( आपल्या राज्याबाहेर ) तलाव खोदविला याचें कारण त्याची माता तेथें निधन पावली असावी असा दुसरा एक तर्क डॉ. सरकार यांनीं केला आहे तोहि बरोबर दिसत नाहीं. उलटपक्षीं महाराज गौरि हा स्वतःच दशपुर येथें राज्य करीत होता आणि म्हणूनच त्यानें तेथें तो तलाव खोदला असें मानणें अधिक सयुक्तिक दिसेल.

---

१२ पूर्वोक्त, पु. ३० पृ. १२० इ.

१३ कॉ. इ. इं., पु. ४, पृ. १३४.

## वराहमिहिरानें दिलेली माहिती

मानवायनिवंशी महाराज गौरि दशपुर येथें राज्य करीत होता असें मानल्यास तेथें पूर्वी अनेक पिढ्या राज्य करीत असलेल्या औलिकर वंशाचें काय झालें, असा प्रश्न उपस्थित होतो. त्यावर वराहमिहिराच्या बृहत्संहितेंतील (अध्याय ८६) खालील उताऱ्यावरून कांहीं प्रकाश पडतो—

> यच्छक्रशुक्रवागीशकपिष्ठलगरुत्मताम् ।
> मतेभ्यः प्राह ऋषभो भागुरेर्देवलस्य च ॥ १ ॥
> भारद्वाजमतं दृष्ट्वा यच्च श्रीद्रव्यवर्धनः ।
> आवन्तिकः प्राह नृपो महाराजाधिराजकः ॥२॥
> सप्तर्षीणां मतं यच्च संस्कृतं प्राकृतं च यत् ।
> यानि चोक्तानि गर्गाद्यैर्यात्राकारैश्च भूरिभिः ॥३॥
> तानि दृष्ट्वा चकारेमं सर्वशाकुनसङ्ग्रहम् ।
> वराहमिहिरः प्रीत्या शिष्याणां ज्ञानमुत्तमम् ॥४॥

या उताऱ्यांत वराहमिहिरानें आपल्या पूर्वीच्या ग्रंथकारांनी शकुनांवर जे ग्रंथ लिहिले होते त्यांचा निर्देश केला आहे. त्यांमध्यें अवन्तीचा महाराजाधिराज द्रव्यवर्धन यानें भारद्वाजमुनीच्या मताचा विचार करून जो ग्रंथ लिहिला होता त्याचाहि उल्लेख आहे. " हा द्रव्यवर्धन कोणत्या वंशाचा व तो कोणत्या काळीं होऊन गेला हें पुरातत्त्ववेत्त्यांनीं निश्चित केल्यास तें फार उपयुक्त होईल " असें म. म. डॉ. पां. वा. काणे यांनी वराहमिहिरावरील आपल्या लेखांत म्हटलें आहे.[१४] आतांपर्यंत याविषयीं निश्चितपणें लिहिणें कठीण होतें. पण आतां कांही सयुक्तिक अनुमानें करतां येतात.

वराहमिहिरानें मागें दिलेली माहिती अत्यंत महत्त्वाची आहे. ती केवळ ऐकीव नाहीं. वराहमिहिर स्वतः उज्जयिनीस राहत होता. त्यानें उज्जयिनीच्या महाराजाधिराज द्रव्यवर्धनाचा शकुनविषयक ग्रंथ पाहिला होता इतकेंच नाहीं तर स्वतःच्या बृहत्संहितेंतील शाकुनिकप्रकरणाकरितां त्याचा उपयोगहि केला होता. तेव्हां त्याच्या काळापूर्वी महाराजाधिराज द्रव्यवर्धन हा उज्जयिनीस राज्य करीत होता यांत संशय नाहीं. वराहमिहिरानें आपला पंचसिद्धान्तिका हा ग्रंथ शक संवत् ४२७ (इ. स. ५०५) यावर्षी लिहिला असा त्यांत स्पष्ट उल्लेख आहे. हा त्याचा पहिला ज्ञात ग्रंथ. तेव्हां तो खिस्तोत्तर सहाव्या शतकाच्या पूर्वार्धांत होऊन गेला हें निश्चित आहे, तेव्हां महाराजाधिराज द्रव्यवर्धन हा निदान इ. स. ५०० ( विक्रम संवत् ५५६ ) च्या पूर्वी झाला असावा.

द्रव्यवर्धनाच्या कालाची पूर्वमर्यादाहि निश्चित करणें कठीण नाहीं. खिस्तोत्तर पहिल्या चार शतकांत उज्जयिनी येथें पश्चिम क्षत्रपांचें राज्य होतें. उज्जयिनीस चष्टन नामक क्षत्रप राज्य करीत होता हें ग्रीक ग्रंथकारांनी नमूद करून ठेवलें आहे. सन ३९५च्या सुमारास द्वितीय चन्द्रगुप्तानें क्षत्रपांचा पाडाव करून माळवा व काठेवाड हे प्रांत आपल्या राज्यास जोडले आणि उज्जयिनी ही आपली दुसरी राजधानी केली. सन ४६७ मध्यें स्कन्दगुप्ताचें निधन होईपर्यंत तरी उज्जयिनी गुप्तांच्या स्वाधीन राहिली असावी. क्षत्रप व गुप्त यांच्या कालांत महाराजाधिराज द्रव्यवर्धनानें उज्जयिनीस राज्य केलें असणें शक्य नाहीं. तेव्हां तो सन ४६७ ते ५०० या काळांत झाला असावा.

' द्रव्यवर्धन ' हें नांव ' आदित्यवर्धन व विष्णुवर्धन ' या नांवांसारखें ' वर्धन ' शब्दान्त आहे. तेव्हां हे तीनहि राजे एकाच वंशाचे असण्याचा संभव आहे.

---

14 ' It would be very useful if antiquarians can find out this king Dravyavardhana of Ujjayini. ' जर्नल ऑफ दि बॉंबे ब्रॅंच् ऑफ रॉयल एशियाटिक सोसायटी, पु. २४-२५, पृ. १ इ.

आदित्यवर्धन ( मा. सं. ५४७ )
⋮
द्रव्यवर्धन ( सुमारें मा. सं. ५५६ )[१५]
⋮
यशोधर्मन्–विष्णुवर्धन ( मा. सं. ५८९ )

द्रव्यवर्धन हा सम्राट् असून उज्जयिनीस राज्य करीत होता हें बृहत्संहितेवरून स्पष्ट आहे. त्याच्याप्रमाणें दुसरे दोघेहि सम्राट् होते हें कोरीव लेखांवरून समजतें. तेव्हां तेहि उज्जयिनीसच राज्य करीत असण्याचा संभव आहे. खिस्तोत्तर पांचव्या शतकाच्या अखेरीस हूणांच्या आक्रमणामुळें गुप्त साम्राज्य खिळखिळें झालें त्यावेळीं दशपुरच्या औलिकरवंशीय आदित्यवर्धनानें उज्जयिनीवर चाल करून तें नगर काबीज केलें असावें. तेथें त्याच्यानंतर द्रव्यवर्धन राज्य करीत होता. त्याच्यानंतर उदयास आलेला यशोधर्मन्–विष्णुवर्धन हा कोठें राज्य करीत होता याचा उल्लेख नाहीं. तथापि तोहि द्रव्यवर्धनासारखा उज्जयिनीसच राज्य करीत होता असें मानण्यास हरकत नाहीं. द्रव्यवर्धन् व यशोधर्मन्–विष्णुवर्धन यांच्या कालांमध्यें फारसें अंतर नसल्यामुळें त्यांचें परस्पर नातें पितापुत्राचेंहि असण्याचा संभव आहे.

मंदसोरजवळ सोंदणी गांवीं यशोधर्मन्–विष्णुवर्धनाचे विजयस्तंभ सांपडले असल्यामुळें तो मन्दसोर ( दशपुर ) येथें राज्य करीत होता असें मानलें जातें, पण तें बरोबर दिसत नाहीं. औलिकरवंशी राजांनीं आपली राजधानी दशपुराहून उज्जयिनीस नेल्यावर दशपुर येथें आपले सामंत मानवायनिवंशी राजांची स्थापना केली असें दिसतें. म्हणूनच त्या वंशाच्या महाराज गौरीचा पूर्वोक्त शिलालेख मन्दसोर येथें सांपडला आहे. यशोधर्मन् – विष्णुवर्धनाच्या काळीं तेथें एक दुसरेंच घराणें राजस्थानीय म्हणून राज्य करीत होतें हें मन्दसोर येथें सांपडलेल्या व यशोधर्म्याच्या काळच्या मालव संवत् ५८९ ( सन ५३३–३४ ) च्या शिलालेखांतील खालील श्लोकावरून दिसून येईल[१६]—

विन्ध्यस्यावन्ध्यकर्मा शिखरतटपतत्
पाण्डुरेवाम्बुराशे-
र्गोलाङ्गूलैः सहेलं प्लुतिनमिततरोः
पारियात्रस्य चाद्रेः ।
आसिन्धोरन्तरालं निजशुचिसचिवा-
ध्यासितानेकदेशं
राजस्थानीयवृत्त्या सुरगुरुरिव यो
वर्णिनां भूतयेऽपात् ॥

या श्लोकांत विन्ध्य व पारियात्र ( अरवलि ) या पर्वतांमधील व पश्चिमेस समुद्रापर्यंत पसरलेल्या प्रदेशावर यशोवर्म्यानें किंवा त्याच्या पूर्वजानें राजस्थानीय म्हणून नेमलेला नैगमवंशी अभयदत्त राज्य करीत होता असें म्हटलें आहे. दशपुरचा प्रदेश याच भागांत मोडतो तेव्हां दशपुर येथें यशोधर्मन्-विष्णुवर्धनाची राजधानी नव्हती हें उघड आहे. ती दुसरीकडे कोठें तरी–बहुधा उज्जयिनीसच असावी.

यशोधर्मा दशपुर ( मन्दसोर ) येथें राज्य करीत नव्हता तर त्याचे विजयस्तंभ त्या नगराजवळ कां उभारले असा कोणी प्रश्न केल्यास त्याचें उत्तर देणें कठीण नाहीं. यशोधर्मा आणि मिहिरकुल यांची जी घनघोर लढाई झाली आणि जिच्यामध्यें मिहिरकुलाचा पूर्णपणें पाडाव होऊन त्याला आपली मान यशोधर्म्यापुढें वांकवावी लागली ती लढाई दशपुराजवळ झाली असावी. आणि म्हणूनच हे विजयस्तंभ मन्दसोरजवळच्या सोंदणी गांवीं उभारले होते, असें दिसतें.

१५ इ. स. ५०० म्हणजे मालव संवत् ५५६.
१६ कॉ. इ. इं., पु. ३. पृ. १५४.









## एक सर्वश्रेष्ठ राजा

वरील विवेचनावरून यशोधर्मन्-विष्णुवर्धन याचे उदयास्त एखाद्या धूमकेतूच्या प्रमाणें झाले नव्हते, तर त्याच्या लेखांत म्हटल्याप्रमाणें त्याचा जन्म श्लाघ्य अशा वंशांत झाला होता. तो वंश प्रथम दशपुर येथें व नंतर उज्जयिनी येथें दीर्घकाळ राज्य करीत असून अत्यंत प्रबळ होता, म्हणूनच यशोधर्म्याला मिहिरकुलासारख्या बलाढ्य हूण नृपतीच्या मगरमिठींतून भारताला मुक्त करतां आलें. भारताच्या सर्वश्रेष्ठ राजांच्या मालिकेंत त्याची गणना होईल.

औलिकर वंशाच्या राजांची वंशावळ ज्ञात वर्षांसह खाली दिली आहे —

### औलिकर राजवंश

जयवर्मन्
|
सिंहवर्मन्
|
नरवर्मन् ( मा. सं. ४६१ व ४७४ )
|
विश्ववर्मन् ( मा. सं. ४८० )
|
बंधुवर्मन् ( मा. सं. ४९३ )
⋮
प्रभाकर ( मा. सं. ५२४ )
⋮
आदित्यवर्धन् ( मा.सं. ५४७ च्या सुमारास )
⋮
द्रव्यवर्धन् ( मा. सं. ५५६च्या सुमारास )
⋮
यशोधर्मन्–विष्णुवर्धन ( मा. सं. ५८९ )

यशोधर्म्याचे वंशज फार काळ उज्जयिनीस राज्य करीत होते असें दिसत नाहीं. इ. स. ५५० च्या सुमारास उदयास आलेल्या कलचुरिवंशी कृष्णराजानें माळवा काबीज केला. त्याचीं नाणीं बेसनगर ( प्राचीन विदिशा ) येथें सांपडलीं आहेत. त्याचा मुलगा शंकरगण याच्या ताम्रपटांतील वर्णनांत गुप्त राजांच्या लेखांतील कित्येक विशेषणें जशींच्या तशीं घेतलेलीं दिसतात. तेव्हां ते लेख उज्जयिनीच्या सचिवालयांत लिहिले असावे. तेव्हां यशोधर्म्यानंतर लौकरच औलिकर वंशाचा अस्त होऊन उज्जयिनी कलचुरींच्या आधिपत्याखालीं गेली असें दिसतें.

---

## वृद्ध देवदूत

स्वराज्य– लोकांनीं आपण होऊन चालविलेलें स्वराज्य– आपणांस प्राप्त झाल्याखेरीज आपल्या उद्धाराचा दुसरा मार्ग नाहीं असें नेटानें, स्पष्टपणें व सोप्या भाषेनें गहिंवरून दादाभाई यांनीं जेव्हां कॉंग्रेस सभेच्या व्यासपीठावरून अखेरीस सांगितलें तेव्हां कोणी वृद्ध देवदूत आपल्या तरुण पिढीस शेवटचा उपदेश करण्याकरितांच अवतरला आहे कीं काय असा क्षणभर भास झाला, व आम्हांस असा भरंवसा आहे कीं, ह्या त्यांच्या शेवटच्या निरोपामुळें तरी सर्व प्रकारची राजकीय चळवळ करण्यांत आमचा अंतिम उद्देश व हेतु काय असावा याबद्दलचा मतभेद इतोत्तर तरुण पिढीमध्यें बिलकुल राहणार नाहीं.

हिंदुस्थानास स्वराज्य मिळालेंच पाहिजे, एरव्ही गत्यंतर नाहीं, हें आमच्या राजकीय चळवळीचें आतां कायमचें प्रधान तत्त्व बनलें आहे; आणि आजपर्यंत एकवीस वर्षांत राष्ट्रीय सभेच्या पूर्व-अध्यक्षांनीं या बाबतींत जी कांहीं घरसोडीचीं विधानें केलीं आहेत तीं आतां सर्व रद्द झालीं आहेत. खुद्द दादाभाई यांनींच असें सांगितलें कीं, बाविसाव्या राष्ट्रीयसभेंत नवें म्हणून जें काय झालें तें हेंच होय. स्वराज्य प्राप्त करून घेणें हेंच तुमचें कर्तव्य आहे असा सिद्धांत मी या सभेंत तुम्हास सांगतों आणि तत्प्रीत्यर्थ तुम्ही काम करून हा हक्क संपादन करा म्हणजे मी आजपर्यंत जें कांहीं केलें त्याचें मला बक्षीस मिळालें, असा त्यांचा आम्हां सर्वांस अखेरचा निरोप आहे.

—लो. टिळक

( केसरी, ता. ८ जानेवारी १९०७ )








श्री. पांडुरंग देसाई

# ' पांग '-- अर्थ आणि व्युत्पत्तिचर्चा

महाराष्ट्र शब्दकोशांत ( विभाग पांचवा, पृष्ठ १९६९ ) पांग या शब्दाचे न्यूनाधिक अर्थभेदानें मुख्यतः सहा अर्थ दिलेले आहेत. त्यांचा संक्षेप असा :– १ उत्कट इच्छा; २ पराधीनता; ३ गरज, इच्छा; ४ उणीव; ५ यातायात; ६ मिंधेपणा, पराधीनतेची जाणीव. यांपैकीं १ आणि ३, व २ आणि ६ हे जवळजवळ एकच होतात. ते वगळ-ल्यास बाकी चार अर्थ उरतात. ते असे :– १ इच्छा, २ पराधीनता, ३ उणीव, ४ यातायात. या शब्दाची व्युत्पत्ति संस्कृत पंगु = लंगडा अशी दाखविली आहे. इतरत्र याचें मूळ संस्कृत अपांग असेंहि सुचविलें आहें.

पांग या शब्दाच्या वरील अर्थांविषयीं, आणि विशेषतः त्याच्या व्युत्पत्तीविषयीं मला शंका येण्याचें मुळींच कारण नव्हतें. अशी शंका परवां परवांपर्यंत मला शिवलीहि नव्हती. पण गेल्या दोन तीन वर्षांत संस्कृत भाषेंत लिहिलेल्या तीन ताम्रपटांत पंग व पांग हे शब्द मला भेटले. त्यांचा अर्थ शोधतांना मराठींतील पांग शब्दाची आठवण झाली. पुढें या शब्दाच्या गृहीत व्युत्पत्तीविषयीं शंका उत्पन्न होऊन जिज्ञासा जागृत झाली. ही जिज्ञासा कदंब त्रिभुवनमल्लाच्या ताम्रपटावरील माझ्या इंग्लिश लेखांत एक टिप्पणरूपानें (Epigraphia Indica, Vol. XXX, p. 75) आणि प्रा. के. आर्. कृष्णशास्त्री स्मारक ग्रंथ ( कन्नड ) ' अभिवंदने ' यांत स्वतंत्र लेखरूपानें प्रकट झाली आहे. पण ही चर्चा महाराष्ट्रीय विद्वानांपुढें मांडणें योग्य व अगत्याचें वाटल्यामुळें येथें हें विवेचन करीत आहे.

### तीन महत्त्वाचे ताम्रपट

भोजवंशीय अशंकितवर्म राजाचा एक ताम्रपट कांहीं वर्षांमागें हलशी या गांवीं ( खानापुर तालुका, बेळगांव जिल्हा ) मिळाला. पुढें त्याचा कापोली गांवाशीं संबंध आल्यामुळें कापोलीचा ताम्रपट असें त्याला नांव दिलें आहे ( Epigraphia Indica, Vol. XXXI, No. 32 ). या ताम्रपटाचा काळ सुमारें ६–७ वें शतक. प्रस्तुत विवेचनाच्या सोयीसाठीं या ताम्रपटांतील कांहीं भाग उद्धृत करतों –

**अशंकितवर्मणो वचनेन वर्तमान भविष्यद्भोगि-कायुक्तकस्थाय्यादयो वक्तव्याः । यथा कैकेयवंश-संभूतेन एलकल्लेन अस्माकं आत्मनश्च पुण्योपचय-निमित्तं अस्मै नागशर्मणे पलाशिकाविषये सोल्लु-न्दूरकसप्ततौ वंशवाटको ज्येष्ट पौर्णमास्यां उदक-पूर्वकं सर्वपंगपरिहृतो दत्तोऽस्माभिरप्यनुमो-दितः ।**

दुसरा ताम्रपट गोवा प्रांतीं पणजी येथें मिळाला. हा गोवाकदंबवंशीय पहिल्या जयकेशीचा असून याचा काळ इ. स. १०५९ होतो. यांत जयकेशी राजानें अरब जातीच्या छडम नांवाच्या अधिका-ऱ्यास लघुमोरांबिका नांवाचें ओसाड गांव वसविण्या-साठीं इनाम दिल्याचें सांगितलें आहे ( Kadamba Kula, pages 396–97; भारत-इतिहास–संशोधक–मंडळ त्रैमासिक, वर्ष ३१, अंक ४ ). इनामाचे करार पुढें वर्णिले आहेत ते असे–

**चंद्रवसुग्रहनिमिते शाके वर्षे विकारिणि प्राप्ते ।**
**आषाढकृष्णपक्षे वारे शशलक्ष्मणस्तथाष्टम्याम् ॥**
**विकारिवत्सरादीनि वर्षाणि सततं दश ।**
**निष्कांस्त्रिंशदिह ग्राह्याः प्रत्यब्दं भैरवाह्वयाः ॥**








संप्राप्ते वत्सरे सौम्ये पंचत्रिंशच्च भैरवाः ।
पांगे गद्याणका ग्राह्या ग्रामेऽस्मिन्मेदिनी भुजा ॥
काणिकपंचकसंज्ञं दशबंधाद्युपकराख्यमिदम् ।
किमपि नो ग्राह्यं न च कार्यं बाधनमपि वेट्टिकरादि ॥

तिसरा ताम्रपट उपरिनिर्दिष्ट गोवाकदंबवंशीय त्रिभुवनमल्ल गूवलदेवाचा. याचा काळ इ. स. ११०७. यांत गंडगोपाल केलिवर्मा नांवाच्या अधिकाऱ्यानें गोवाप्रांतीं एक ब्रह्मपुरी निर्माण करून तेथें बाहेरून विद्वान् ब्राह्मणांचीं कुटुंबें आणून ठेवलीं व त्यांच्या निर्वाहासाठीं खेतीवाडींची व्यवस्था करून दिली असें सांगितलें आहे. यांतील प्रकृत विषयाशीं संबंधित भाग असा :—

केलिवर्मा तु धर्मधीः ॥
पुरोहितमहामात्य स्वामिभूपालसन्निधौ ।
नानादेशसमायात ब्राह्मणाना सन्निधाप्य च ॥
गोवदीवाभिधे देशे ग्रामे रट्टोडनेउरे ।
पूगीवनं शताद्देवात्क्रीत्वा प्रादान्नमस्यकम् ॥
..................................
तद्ग्रामात् सोन्नारज्ववी चिंचखण्डीति पालणम् ।
शतात् क्रीत्वा ददौ सर्वमेतत् पांगादिवार्जितम् ॥

( Epigraphia Indica, Vol. XXX, pp. 76–77 )

वर उद्धृत केलेल्या अवतरणांत तीन निरनिराळ्या स्थळीं ' सर्वपंगपरिहृत, ' ' पांगे गद्याणका ग्राह्याः ' आणि ' पांगादिवर्जित ' या शब्दसमूहांत **पंग** आणि **पांग** हे शब्द आढळतात. हे दोन्ही शब्द एकाच अर्थी उपयोगिले असावेत असें दिसतें. संदर्भ पाहिल्यास हा पंग किंवा पांग राज्यपालाला द्यावयाचा एक प्रकारचा कर किंवा करभार असावा असेंहि लक्षांत येतें.

पण पांग या शब्दाला याहून निश्चित अर्थ सांगणें शक्य नाहीं काय ? आणि हा शब्द कोणत्या भाषेंतला ? या प्रश्नांचें उत्तर देण्याचा प्रयत्न करतों.

## कानडींतील ' पंगु '

संस्कृत भाषेंत पंग किंवा पांग हे शब्द नाहींत. इतरत्र उपलब्ध झालेल्या ताम्रपटांच्या भाषेंतहि हे शब्द मिळत नाहींत. याकरितां हे लेख ज्या राजांचे आहेत त्यांच्या राज्यांत किंवा जवळच्या प्रदेशांत प्रचलित असलेल्या भाषेंतून ते राजकीय व्यवहारांत रूढ झाले असावेत असें म्हणावें लागतें. ही भाषा त्या प्रदेशांतली म्हणजे कानडी असावी या आधारावर अधिक चिकित्सा केली तर मार्गदर्शन होतें; तें असें.

आधुनिक कानडींत हंगु असा शब्द आहे. त्याचें प्राचीन रूप **पंगु**. पंगु म्हणजे मिंधेपणा, उपकार, उपकारबद्ध होणें, इत्यादि. **पंगुपासून पंग किंवा पांग** हा शब्द राज्यव्यवहारांत प्रचारांत आला असावा. राजाकडून देणगी किंवा इनाम पावलेल्या माणसानें या उपकारानिमित्त प्रतिफल म्हणून किंचित् करभार द्यावा असा नियम असलेलीं अनेक उदाहरणें आढळतात. ( हा विषय अप्रस्तुत असल्यामुळें जास्त तपशीलांत शिरत नाहीं. ) या प्रकारच्या उपकृतीचा किंवा उपकारबद्धतेचा कर म्हणजे पांग. हा कर सामान्यतः ब्राह्मणाकडून घेत नसत. यासाठीं पहिल्या व तिसऱ्या ताम्रपटांत हा पंग किंवा पांग नांवाचा कर वर्ज्य केल्याचें सांगितलें आहे. दुसऱ्या ताम्रपटांत दान घेणारा गृहस्थ अधिकारी असल्यामुळें त्यानें पहिलीं दहा वर्षें पांग म्हणून तीस निष्क राजाला द्यावेत. आणि नंतर पुढें थोडें अधिक म्हणजे पस्तीस गद्याण ( निष्क = गद्याण ) द्यावेत असा करार घातला आहे.

माझ्या समजुतीप्रमाणें वर सुचविलेला पांग शब्दाचा अर्थ सयुक्तिक आहे. पांग शब्दाप्रमाणें कानडी भाषेंतला आणखी एक शब्द वर उद्धृत केलेल्या दुसऱ्या ताम्रपटांतील भागांत आढळतो. तो म्हणजे ' काणिक ' याचें कानडी मूळ ' काणिके ', अर्थ ' नजराणा ' काणिकेचें



अनुक्रमणिका







'काणिक' असें संस्कृत रूप बनलें. या प्रयोगानें वर मी सुचविलेल्या पांग शब्दाच्या व्युत्पत्तीला पुष्टि मिळते. यावरून यासारखे कानडी भाषेंतील शब्द राज्यव्यवहारांत त्याकाळीं रूढ झाले असावेत या अनुमानास बळकटी येते.

## 'पांग' च्या अर्थावर नवा प्रकाश

आतां ताम्रपटांतील ह्या प्रयोगांचें साह्य घेऊन मराठी वाङ्मयाकडे वळूं. मला वाटतें वर दाखविलेला पांग या शब्दाचा मुख्यार्थ लक्ष्यांत घेऊन मराठींतील प्रयोगांचें परीक्षण केल्यास पांग शब्दाच्या अर्थावर मूलत: प्रकाश मिळून अनेक कोडयांचा उलगडा होईल. पांग म्हणजे 'मिंधेपणा' जेथें आहे तेथें त्यांतून सुटण्याची 'चिंता' 'उत्कट इच्छा' आणि 'गरज' भासूं लागते; आणि मिंधेपणा म्हणजे एक प्रकारची 'उणीव' च होय. मिंधेपणाच्या मागोमाग 'यातायात' पण येतेच.

वरील माझें प्रतिपादन सिद्धान्त रूपानें मांडलेलें नाहीं. ती एक माझी नम्र सूचना आहे. महाराष्ट्रीय संशोधकांनीं याचा योग्य विचार करावा. मराठींतील पांग शब्दाचे सर्वच प्रयोग कानडी 'पंगु' या मूळापासून निघाले असावेत असें मी म्हणत नाहीं. मराठी भाषा-संशोधकांनीं सुचविल्याप्रमाणें संस्कृत 'पंगु' किंवा 'अपांग' या शब्दांवरूनहि कांहीं प्रयोग कदाचित् आले असतील. पण या व्युत्पत्ति-शास्त्राच्या आखाडयांत कानडींतील 'पंगु' पासून निघालेला 'पांग' हा शब्दहि उमेदवार म्हणून उभा आहे याची जाणीव ठेवून मराठींतील प्रयोगांचें परीक्षण आणि मूल्यमापन करणें सत्य-शोधनाच्या दृष्टीनें अगत्याचें आहे. या प्रकारचें संशोधन आणि विवेचन माझे महाराष्ट्रीय व्यवसाय-बंधु करतील अशी आशा बाळगतों.

---

## सशास्त्र विवाह

हिंदुस्थानास स्वराज्य पाहिजे आणि तें स्वराज्य मिळविणें हेंच कॉंग्रेस सभेचें कर्तव्य आहे, अशा रीतीचें जोरानें आणि वजनानें प्रतिपादन करणारा दादाभाई नवरोजीपेक्षां अधिक योग्य अध्यक्ष कॉंग्रेस सभेस खचित मिळाला नसता. किंबहुना दादाभाई-पेक्षां वयानें, अनुभवानें, आणि सन्माननीयतेनें किंचित् कमी माणसानें जर हीच गोष्ट कॉंग्रेस सभेच्या व्यासपीठावरून कंठरवानें सांगितली असती, तर नरम पक्षांतील लुंग्यासुंग्यानींच नव्हे, तर महावीरांनीं देखील तिचा हल्लींप्रमाणें मुकाटयानें स्वीकार केला नसता.

दादाभाई नवरोजी आपल्या भाषणांत 'सेल्फ गव्हर्मेंट' किंवा 'होमरूल' या इंग्रजी शब्दाचाच उपयोग करून राहिले आहेत असें नाहीं, तर सकल महाराष्ट्रीयांस परिचित झालेल्या स्वराज्य शब्दाचा त्यांनीं जाणुनबुजून आपल्या लेखांत व भाषणांत उपयोग केला आहे. राष्ट्रीय सभा आणि स्वराज्य यांची अशा रीतीनें या वृद्ध महापितामहानें घालून दिलेली गांठ किंवा सांगड आतां कोणाच्यानेंहि तोडली जाणार नाहीं. बाविसाव्या राष्ट्रीय सभेंत सदर सभेच्या कार्यक्रमासंबंधानें जो मोठा फेरफार झाला तो हाच होय. राष्ट्रीय सभा आणि स्वराज्याचा हक्क यांचा 'सभा वयांत आल्यानंतर' राजकीय चळवळीचे सन्माननीय व वृद्ध महर्षि उपाध्याय दादाभाई यांच्या हातून गेल्या डिसेंबर महिन्यांत सशास्त्र विवाह लावण्यांत आला आहे; व हा विवाह-संबंध राष्ट्रीय सभेशीं पितृत्वाचें नातें जोडणाऱ्या कित्येक गृहस्थांस जरी पूर्ण पसंत नसला तरी तो तोडणें किंवा त्यांत यत्किंचित् व्यत्यय आणणें आतां अशक्य आहे.

— लो. टिळक

(केसरी ता. ८ जानेवारी १९०७)










प्रा. सुमंत मुरंजन

# गौतम बुद्धाची शिकवणूक

[ बुद्धवासी डॉ. बाबासाहेब आंबेडकर व त्यांच्या समवेत हजारो हरिजनांनीं दसऱ्याच्या सुमुहूर्तावर बुद्धधर्म स्वीकारला ही घटना भारताला युगप्रवर्तक ठरण्याचा बराच संभव आहे. ह्या घटनेची बहुतेक निरीक्षकांनीं सामाजिक संगति व अर्थ लावला ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. आमच्या मतें हें आमच्या संकुचित मनोवृत्तीचें लक्षण आहे. बुद्धाला शरण गेल्यानें अस्पृश्यता व सर्वसाधारणपणें जातिभेदामुळें हिंदुसमाजांत निर्माण झालेले मानसिक गंड नष्ट होतील ह्या विषयीं कित्येकास शंकाच आहे. बुद्धानुयायी म्हणजेच पूर्वास्पृश्य असें समीकरण अस्तित्वांत येणार असेल तर त्यांची शंका अस्थानीं आहे असें म्हणतां येत नाहीं. बुद्धधर्म जर भारतांतून जवळ जवळ पूर्णपणें नाहींसा झाला नसता तर असल्या समीकरणाची भीति वाटण्याचें इतकें कारण नव्हतें. तथापि बुद्धधर्माच्या पुनरुज्जीवनामुळें भारत व सिलोन, बर्मा, चीन, जपान वगैरे देशामध्यें नवीं सामाजिक बंधनें निर्माण होण्याचा संभव आहे ही गोष्ट दृष्टिआड करणें इष्ट नाहीं. हे संबंध जर अधिकाधिक निकटचे झाले तर हरिजनांच्या सांप्रतच्या परिस्थितींत इष्ट फरक खास घडून येतील. भारताच्या दुर्दैवानें बुद्धधर्म स्वीकारण्यानें जर सामाजिक प्रगति घडून आली नाहीं तर बाबासाहेब व त्यांचे अनुयायी व इतर सहचारी ह्यांचा तो दोष आहे असा कोणीहि विचारवंत दावा करणार नाहीं. हिंदुसमाज व हिंदुत्व ह्यांचीच परागति व पराजय त्यामुळें झाला असें म्हणावें लागेल.

विजयादशमीच्या दिवशीं घडून आलेल्या घटनेचा केवळ सामाजिक अर्थ लावणें हिंदुत्वाच्या संकुचित मनोवृत्तीचें लक्षण आहे असें वर म्हटलें आहे. वास्तविक पाहतां हिंदुत्वाच्या दृष्टीनें ह्या घटनेचा विचार तत्त्वज्ञानाच्या पातळीवरच झाला पाहिजे. आत्म्याचा विचार करावा, त्याचें ध्यान करावें, त्याचा ध्यास लावून घ्यावा असा हिंदी तत्त्वज्ञानाचा आग्रह आहे. 'उद्धरेत् आत्मनात्मानं' अशी त्याची शिकवण आहे. परंतु त्याच वेळीं मुमुक्षूनें एकच विशिष्ट तत्त्वज्ञान अथवा एखादाच विशिष्ट धर्मसंस्थापक मान्य केला पाहिजे असा हिंदुत्वानें केव्हांहि हट्ट धरलेला नाहीं. उच्च पातळीवर मानवी जीवनाचा विचार केला म्हणूनच द्वैती, अद्वैती, विशिष्टाद्वैतीच काय परंतु निरीश्वरवाद्यांचा देखील समावेश हिंदुत्वांत होऊं शकतो. गौतमबुद्ध तर भारतीयच होता व प्रचलित भारतीय तत्त्वज्ञानांत त्यानें क्रांतिकारक भर टाकली. बुद्धाला ईश्वरी अवतार समजणें हा केवळ तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें महाप्रमादच होय. परंतु त्यावरून हिंदुत्वाचें जीवन-दर्शन किती विशाल व सर्वसंग्रही आहे हेंच सिद्ध होतें. बाबासाहेब व त्यांच्या सहकाऱ्यांच्या आव्हाना-मुळें लुप्त झालेलें गौतम बुद्धाचें तत्त्वज्ञान भारताच्या कानाकोपऱ्यांत जर निनादलें तर सर्व हिंदी तत्त्व-ज्ञानांची त्यामुळें जागृतीच घडून येणार आहे.

विजयादशमीची घटना महाराष्ट्रास संतोष व अभिमान वाटण्यासारखीच आहे. श्रद्धा नाहीं, म्हणजे पर्यायानें अंध अनुयायित्व त्यास मानवत नाहीं असा महाराष्ट्रावर केलेला आरोप जुनाच आहे. केवळ इतिहासच पाहिला तर हा आरोप बहुतांशीं चुकीचा आहे हें सिद्ध करणें कठीण नाहीं. तथापि महाराष्ट्र










बुद्धीला विसरत नाहीं. प्रचलित अत्यंत कठीण अशा सामाजिक प्रश्नाकडे देखील तो बुद्धीनेंच पाहतो, भावनेच्या उद्रेकापेक्षां तत्त्वज्ञानाच्या पातळीवरच मानवतेच्या कूटप्रश्नांचा निकाल लावणें त्यास पसंत पडतें हेंच श्री. बाबासाहेबांनीं सिद्ध केलें आहे. गीतारहस्य प्रसिद्ध झाल्यावर जीं जीवितमूल्यें शोधण्याची लाट येऊन गेली तोच मोका आज महाराष्ट्रापुढें उभा आहे. तेव्हां समोरील परिस्थितीकडे शांत, विशाल व विवेचक दृष्टीनें पाहून महाराष्ट्रानें आपला बौद्धिक व सामाजिक उद्धार करून घेण्याची शिकस्त करावी अशी आमची विनंति आहे– लेखक ]

गौतम बुद्धाच्या महापरिनिर्वाणाची २५०० वी संवत्सरी अखिल भारतांत नुकतीच साजरी झाली हें नवोदित युगाचें लक्षणच समजलें पाहिजे. केवळ ४०-५० वर्षांपूर्वी देखील तथागताचें अवतारकार्य कोणत्या शतकांत घडलें ह्याविषयीं साशंकताच होती. मग त्याचें जीवन आणि तत्त्वज्ञान ह्याबद्दल त्याच्या जन्मभूमींत सर्वत्र अंधःकारच होता ह्यांत कांहींच नवल नाहीं. इतिहासाची पारंपारिक अवहेलना हें हिंदुत्वाच्या उदासीनतेचें एक मुख्य कारण होतेंच. परंतु त्यांत हिंदु पुरोहितशाहीचाहि बराच हात होता. सम्यग्दृष्टीनें पाहिलें तर बुद्धधर्माच्या समाप्तीला लहान मोटीं दोनचार कारणें घडलीं. परंतु शंकराचार्यांच्या ७ व्या शतकांतील वेदान्ताच्या प्रचारापुढें बुद्धधर्मानें हार खाल्ली एवढाच आमच्या पुरोहितशाहीचा आत्मप्रौढीवर अपप्रचार ऐतिहासिक सत्य म्हणून मान्य झालेला दिसतो. हूणलोकांनीं तक्षशिला विद्यापीठ जमीनदोस्त केलें अथवा शशांक व त्याच्यानंतर इ. स. १३०० च्या सुमारास बख्त्यार खिलजी ह्यानीं नालन्द विद्यापीठाच्या एका दगडावर दुसरा दगड शिल्लक राहूं दिला नाहीं हा इतिहास, आधींच इतिहासाशीं हाडवैर असणाऱ्या पुरोहितशाहीस दिसला असता तर मोटें नवलच होतें. हूणांच्या नरराक्षस मिहिरकुलास आणि मुसलमानांच्या बख्त्यार खिलजीस शंकराचार्यांच्या बरोबरीनें प्रतिशंकराचार्य बनविलें नाहीं हा पुरोहितशाहीचा भारतावर उपकारच समजला पाहिजे. अगदीं निःपक्षपाती दृष्टीनें पाहिलें तर इ. स. ८००–९०० पासून तो ब्रिटिश अमदानी भारताच्या मानगुटीवर बसेपर्यंतचा काल म्हणजे हिंदुत्वाच्या अधःपाताचाच काल समजला पाहिजे. फार तर एखाद-दुसरें शतक किंवा एखाददुसरा प्रदेशच ह्या अधःपातास अपवाद म्हणून सांगता येईल. हा अधःपात कोणत्या थरास जाऊं शकला ह्याचें भीषण चित्र ॲबे दुब्वा सारख्या निरीक्षकांच्या १८०० सालाच्या सुमारास लिहिलेल्या आत्मचरित्रपर ग्रंथांत चांगलेंच प्रचीतीस येतें. ह्या अधःपातासच आमच्या पुरोहितशाहीचें उज्ज्वल कर्तृत्व समजावयाचें असल्यास मात्र गोष्ट निराळी.

## बुद्धाच्या तत्त्वज्ञानाविषयीं अनास्था

गौतम बुद्ध आणि त्याचें तत्त्वज्ञान ह्याविषयीं अनेक शतकें दाटलेलें अज्ञानपटल दूर करण्यांत शास्त्र आणि विज्ञान ह्या इतर क्षेत्राप्रमाणें पाश्चात्त्य पंडितांचेच श्रम बहुतांशीं कारणीभूत झालेले आहेत. चालू शतकाच्या प्रारंभीं देखील हिंदी विश्वविद्यालयांत पाली भाषेचा अभ्यास आपद्धर्म म्हणूनच स्वीकारण्याची प्रथा होती. गेल्या पन्नास वर्षांत ह्या विषयावर प्रसिद्ध झालेलें भारतीय वाङ्मय पाहिलें तर एखाददुसरा ग्रंथ सोडून इतर लेखन उथळ, व्यासंगशून्य, प्रचारकी किंमतीचेंच आढळतें. नुकत्याच झालेल्या उत्सवाच्या निमित्तानें तरी भारतीय विचारसृष्टींत खळबळ उडविणारें वाङ्मय प्रसिद्ध होईल अशी आशा होती. परंतु दोन चार संकीर्ण लेख सोडून दिले तर आजतागायत तरी गौतमबुद्ध आणि त्याचें तत्त्वज्ञान ह्याची वारसदारी राजकारण-क्षेत्रांत जमलेल्यांकडेच गेलेली दिसते.

## गौतम बुद्धाची शिकवणूक

गौतम बुद्धाचें जीवितकार्य आणि तत्त्वज्ञान ह्यांचें यथार्थ दर्शन करून देणें हें दुर्घटच आहे. खुद्द बुद्धाच्या काळीं लेखनकला अस्तित्वांत असल्याचें दिसत नाहीं. त्याची सर्व शिकवण एका मुखापासून दुसऱ्या मुखाकडे अशीच प्रसृत झाली. ऐतिहासिक नवलाची गोष्ट अशी कीं जी लेखनकला बुद्धकालीं अवगत नव्हती ती पुढील दोनशें तीनशें वर्षांत इतकी सार्वत्रिक झाली कीं स्तंभावर अथवा शिलावर तथागताचा संदेश कोरून बुद्धधर्माचा प्रसार सम्राट अशोक अखिल भारतांत करूं शकला. परंतु मध्यंतरीच्या कालांत आणि हिंदूंच्या रिवाजाप्रमाणें पुढील आठ दहा शतकांत भगवन्ताच्या शिकवणुकींत इतक्या प्रक्षिप्त वचनांची भर पडली कीं मूळचा संदेश आणि त्यावर चढविलेला वेगडी साज ओळखणें दूरापास्तच झालें आहे.

### अकारण गैरसमज

बुद्धाचें कांहीं प्रसंगाचें मौन विलक्षण गैरसमजुतीस कारण झालें आहे. वास्तविक पहातां त्याच्या वेळोवेळींच्या मौनाचा तसाच खोल अर्थ होता. गौतम आध्यात्मिक कूट प्रश्न टाळीत असे असा एक त्याच्याविषयीं अपप्रचार आहे. एवढें खरें कीं अध्यात्मक्षेत्रांत केवळ वादाकरितां वाद माजविण्यास त्यानें केव्हांच उत्तेजन दिलें नाहीं. तथागताचें जीवनकार्य मानवतेच्या दु:खांचा परिहार हें होतें; तत्त्वज्ञान लढविणें हें नव्हतें. चार चिरंतन सत्यें आणि त्या सत्यांचा निष्कर्ष म्हणजे तथागतानें उपदेशिलेला दैनंदिन अष्टविध नीतिमार्ग ह्यावरच बुद्धाचा भर असे. " भगवान् अक्रियावादी आहेत काय ? " ह्या प्रश्नाला उत्तर म्हणून बुद्धानें आपल्या अष्टविध आचारमार्गाकडे अंगुलीनिर्देश केला ही चिन्तनीय घटना आहे. त्या अष्टविध मार्गांत योगक्षेमाच्या नीतिसंमत व्यवसायाचा देखील अंतर्भाव केला आहे, हा त्यापेक्षांहि सूचक मुद्दा वाटतो. हें सर्व खरें असलें तरी बुद्धानें हिंदी तत्त्वज्ञान व अध्यात्मशास्त्रांत आमूलाग्र क्रांती घडवून आणली हें दृष्टीआड करणें सत्याला धरून नाहीं. बुद्धाची विवेचनपद्धती देखील तितकीच क्रांतीकारक होती. जेव्हां जेव्हां तथागतानें एखाद्या कूटस्थळीं मौन स्वीकारलें तेव्हां तेव्हां प्रस्तुत मुद्दा मानवी ज्ञानाच्याच काय परंतु मानवी अनुभूतीच्या पलीकडचा आहे हेंच त्यानें ध्वनित केलेलें आढळेल. ज्या ज्या वेळीं इष्ट होतें त्या त्या वेळीं बुद्धानें आपलें तत्त्वज्ञान तीक्ष्ण आणि धारदार शब्दांत मांडलें आहे. त्याच्या अनेक सूत्रांत त्याची तर्कपद्धति उटावानें अनुभवास येते. बौद्ध अध्यात्मशास्त्रांत चार अव्याकृत वस्तूनी म्हणजे मानवी ज्ञानाच्या पलीकडचीं व म्हणून अनिर्णीत तत्त्वें आहेत. त्या वस्तूंची मांडणी ध्यानांत घेतली म्हणजे तथागताची शिकवणूक कशी मूलग्राही अध्यात्मापासून उत्पन्न झालेली आहे तें लक्षांत येतें.

### तत्कालीन विचारप्रवाह आणि गौतमाचें बंड

बुद्धाचा अध्यात्मवाद समजून घेतांना त्याच्या समकालीन विचारप्रवाहाकडे निरखून पहाणें अत्यावश्यक आहे. त्या विचारप्रवाहांत सर्वांत अत्यंत पुरातन म्हणजे वैदिक ब्राह्मणांनीं पुरस्कार केलेलें कर्मकांड होय. यज्ञयाग केले म्हणजे देवता प्रसन्न होतात व मानवांच्या इच्छा पूर्ण करतात अशी ती विचारसरणी होती. ह्या यज्ञयागांच्या सपाट्यामुळें राजेरजवाडे, जमीनदार लोक आणि सामान्य जनता ह्यांमध्यें बुद्धाच्या कालीं तेढ उत्पन्न झाली असावी अशीं थोडीं चिन्हें दिसतात. यज्ञयाग करणारे बहुश: राजेरजवाडे वा जमीनदारच असणार. परंतु दूधदुभत्या जनावरांच्या सरसकट हत्यांचे परिणाम भोगणार ते शेतकरी वर्गालाच. गौतम बुद्ध स्वत: एका शेतकरी संघराज्यांतच जन्मला होता. त्याच्या बापाचें नांव शुद्धोदन म्हणजे उच्चप्रतीच्या तांदुळाची लागवड करणारा असें होतें हें सूचकच दिसतें. गौतम बुद्धाचें यज्ञयागांचा निषेध करणारें तत्त्वज्ञान सर्वसाधारण

जनतेला आकर्षक कां झाले ह्याचा उलगडा कांहीं अंशीं तरी तत्कालीन आर्थिक परिस्थितींत सांपडणें संभाव्य दिसतें.

तत्कालीन दुसरा विचारप्रवाह म्हणजे क्षत्रियानीं कर्मकांडाला तोड म्हणून चर्चिलेलें उपनिषदांचें तत्त्वज्ञान होय. त्या तत्त्वज्ञानाचा भव्य रथ आत्मा म्हणजे ज्ञाता व ब्रह्मन् म्हणजे ज्ञेय ह्या दोन चाकावर आरूढ केलेला होता. 'विज्ञातारम् अरे केन विजानीयात्' ह्या मानसशास्त्रापलीकडे आत्म्याच्या अस्तित्वाचें प्रमाण गेलेलें आढळत नाही. 'किम् असत: सत् जायेत,' अथवा 'चक्षुर्वै सत्यम्' आणि 'सत्यस्य सत्यम्' ह्या पलीकडे ब्रह्मन् विषयीं पुरावा आढळेल असें वाटत नाहीं. गौतमानें आत्मा आणि ब्रह्मन् ह्या दोघांचाहि इन्कार करून उपनिषद् तत्त्वज्ञानाचा रथ उध्वस्त करून टाकला.

कर्मकांड आणि औपनिषद तत्त्वज्ञान ह्याच्या समवेतच गोषालाच्या अविरत उत्क्रांतीवादापासून जैन तत्त्वज्ञान प्रसृत झालें होतें. बहुसंख्य आत्मे आणि ईश्वराच्या ऐवजीं जडाला ग्रासणारा कर्मवाद हीं जैनधर्माचीं आद्य तत्त्वें होत. तथागतानें आत्म्याची अडगळ मानवतेच्या मार्गांतून बाजूला सारली व आत्म्याची जडापासून सुटका करण्याकरितां प्रचलित असलेल्या उपासतापास, देहदण्डनादि प्रकारांचा निषेध केला.

ही सर्व पार्श्वभूमि न्याहाळून पाहिली म्हणजे गौतमाचें बंड प्रचलित तत्त्वज्ञानाला किती जहाल आणि मारक होतें त्याची कल्पना येईल.

## बुद्धाचें मानसशास्त्र

प्रथमत: मन, मानस अथवा आत्मा हा विषय बुद्धानें कसा मांडला तें पहा. मनाच्या व्यापारास मर्कटलीलांची उपमा सर्व धार्मिक अथवा नैतिक वाङ्मयांत आढळते. बुद्धवाङ्मयांत देखील ती उपमा वारंवार प्रत्ययास येते. फरक इतकाच कीं इतर वाङ्मयांत तें फक्त अलंकारिक वर्णन असाच अर्थ योजलेला असतो. बुद्धवाङ्मयांत मात्र एक विशिष्ट मानसशास्त्र त्या उपमेंत समावलेलें आहे. माकड एका डहाळीवरून दुसऱ्या डहाळीवर उडी मारतें दुसऱ्या डहाळीवर पाय ठरतो न ठरतो तोंच तिसऱ्या डहाळीवर झेंप पडते. ज्याला आपण आत्मा अथवा मन असें समजतो तें खरोखरीं सद्वस्तु नसून ह्या सर्व लीलांची बेरीज ह्या पलीकडे त्यास अस्तित्व नाहीं. सकाळीं जागृतावस्था आल्यापासून तो रात्रीं झोप येईपर्यंत माणसाला अनेक संवेदना, अनेक अनुभव, घडत असतात. ह्या सर्व संवेदनांचे, अनुभवांचे जे संस्कार त्यांना एकत्र कल्पून अथवा आठवून माणूस त्यास आत्मा, मन अथवा मानस असें सामुदायिक नांव देतो. नंतर त्या नांवासच सद्वस्तु कल्पितो व आपली फसवणूक करून घेतो. जेम्स जॉईसच्या 'युलिसिस' ह्या कथेंत किंवा बा. सि. मर्ढेकरांच्या "रात्रीचा दिवस" ह्या कथेंत मानसाच्या विस्कळित व बेबंदशाही व्यापारांचें जें दर्शन होतें त्याचें यथार्थ ज्ञान करून घेतलें तर बुद्धाच्या मानसशास्त्राचें मर्म तेव्हांच ध्यानांत येतें. एका वाक्यांत सांगावयाचें तर विशप बार्क्लेच्या आंतरिक ज्ञानाच्या तत्त्वज्ञानास डेव्हिड ह्यूमनें जें प्रत्युत्तर केलें तें प्रत्युत्तर त्यांच्या पूर्वी दोन हजार वर्षांच्या अंतरानें गौतम बुद्धानें अचुक हेरलें होतें.

## तथागताचें स्वरूप

माणसांत चिरंतन आणि अमर्त्य असें कशांचेंच अस्तित्व सांपडत नाहीं हेंच यमक सूत्रांत बुद्धानें स्पष्ट केलें आहे. सर्वसाधारण माणूसच काय परंतु प्रत्यक्ष तथागत म्हणजे कोण ही विचारणा त्या सूत्रांत केली आहे. "यमका, तथागत म्हणजे त्याचें शरीर काय ?" वत्सगोत उत्तर करतो, "नाहीं भगवन् ! इतर माणसांच्या शरीराप्रमाणें तथागताचें शरीर देखील केव्हांतरी पतन पावेल, तें कुजून जाईल आणि मातींत जमा होईल. तेव्हां










तथागत म्हणजे त्याचें नष्ट होणारें शरीर खास नाहीं " बुद्धानें पुन्हा प्रश्न केला "तर मग यमका, तथागत म्हणजे त्याच्या संवेदना, भावना, विचार वगैरेंचा समुच्चय काय ? " यमक उत्तर करतो " नाहीं, महाराज. क्षणोक्षणीं बदलणाऱ्या ह्या मानसिक व्यापारांचें एकत्रित अस्तित्व कसें असूं शकेल ? वाळूचे जसे कण तसे संवेदना, भावना, विचार हे मानसिक अणू होत. ते कोठून येतात व कोठें विखुरले जातात हें सांगणें कठीणच. " भगवन्त पुन्हां विचारतात " यमका, शरीराच्या बाहेर, मानसिक अणूंच्याहि पलीकडे, तथागताचें अस्तित्व असणें शक्य आहे काय ? " यमक म्हणतो " भगवन, दृष्ट तथागताच्या बाहेर अदृष्ट तथागत कसा असूं शकेल. " बुद्धानें सूत्राचें सार एकत्रित केलें " यमका, तर मग तुला समजलेंच असेल कीं तथागत म्हणजे त्याचें शरीर नाहीं. तथागत म्हणजे त्याचा संज्ञाप्रवाह नाहीं. तथागत त्याच्या शरीराच्या व संज्ञाप्रवाहाच्या बाह्य नाहीं. चिरंतन आणि अमर्त्य असा तथागतच नाहीं. "

## अनात्मवाद

वत्सगोत सूत्रांत बुद्धाचा अनात्मवाद प्रत्यक्षच प्रतिबिंबित झालेला आहे. वत्सगोत प्रश्न करतो " भगवन्, आत्मा अस्तित्वांत आहे काय ? " बुद्धानें उत्तरच दिलें नाहीं. तेव्हां वत्सगोतानें जरा पुढें जाऊन शंका मांडली. " भगवन्, आत्मा नाहीं असें आपण सूचित करतां काय ? तरी देखील बुद्धानें आपलें मौन सोडलें नाहीं. तेव्हां वत्सगोत गोंधळांत पडला व त्यानें प्रयाण केलें. जवळच असलेल्या आनंदानें ह्या मौनाचें मर्म काय म्हणून पृच्छा केली, तेव्हां तथागतानें स्पष्टीकरण केलें तें असें: " आनंदा, आत्मा अस्तित्वांत आहे असें म्हटलें तर चिरंतन अशी सद्वस्तु आहे असा वत्सगोतानें समज करून घेतला असता. तुला माहीत आहेच कीं विश्वांत चिरंतन असें कांहींच नसून प्रतिक्षणीं बदल एवढेंच एक शाश्वत सत्य आहे. प्रत्येक प्रश्नोत्तराच्या समयीं पृच्छकानें तथागताच्या शब्दापासून भलतींच अनुमानें काढून आपली गैरसमजूत करून घेऊं नये ह्याविषयीं तथागत फार दक्ष असे. आत्मा आहे असें म्हटलें तर दैनंदिन संज्ञाप्रवाह हीच चिरंतन सद्वस्तु आहे असा समज होण्याचा संभव होता. आत्मा नाहीं असें म्हटलें तर अस्तित्व आणि नास्तित्व म्हणजे काय ह्याविषयीं विपर्यास झाला असता. अस्तित्व आणि नास्तित्व हे गुण माणसाच्या दैनंदिन अनुभवास लावणें सार्थ होतें. कारण त्याच्यांत स्कंध म्हणजे इंद्रियगोचर संज्ञा व दिक्कालादि प्राग् अनुभव ह्याचें मिश्रण असतें. परंतु अनादि, अनंत, अविचल असे विषय मानवी ज्ञानाच्या आवाक्याच्या बाहेर आहेत असें ठरविल्यावर अस्तित्व आणि नास्तित्व हे दररोजच्या संज्ञाप्रवाहालाच योग्य असणारे शब्द तसल्या संदर्भांत गैरलागूच समजले पाहिजेत. हा विसंगतीचा दोष तथागत मोठ्या दक्षतेनें टाळीत असे.

## तृष्णेचा निरास म्हणजे दुःखविमोचन

बुद्धाची मानवी जीवनाविषयींची शिकवणूक त्याच्या आत्म्याबाबत दिलेल्या नास्तिपक्षाचा तर्कशुद्ध परिपाक आहे. जगांत दुःख आहे खास. सुख आणि दुःख, शिव आणि नृशंसता हा नुसता आभास आहे, असली विचारसरणी बुद्धाच्या विशाल हृदयाला पटत नव्हती. दुःख आहे तर त्याला कारण असलेंच पाहिजे. कारणाशिवाय कार्य शक्य नाहीं आणि कार्याशिवाय कारण असूं शकत नाहीं असें बुद्धाच्या तत्त्वज्ञानाचें एक मूलवाक्य आहे. तर मग दुःखाचें कारण कोणतें ? दुःखाचें कारण तृष्णा. बुद्धाच्या वैचारिक विश्वांत तृष्णा ह्या शब्दाची अर्थव्याप्ति फार कूट आणि दूरगामी आहे. तृष्णा म्हणजे नुसती ऐहिक

विषयांची ओढ नव्हे. माणसाला जन्मापासूनच संज्ञा असते. बाह्य जगाशीं संबंध वाढत गेला म्हणजे त्याच्या संज्ञाप्रवाहांतून आपला निराळेपणा अथवा अहंभाव हळुहळू उदयास येतो. व्यक्तिमत्त्वाची जाणीव अथवा आपल्या अमर्त्य आत्म्याविषयींची श्रद्धा हीं केवळ मूल अहंभावाचीं उदात्तीकरणें होत. अहंभाव, व्यक्तिमत्त्व, आत्मश्रद्धा, जीवनासक्ती हीं सर्व तृष्णामूल असतात. तृष्णेचा निरास म्हणजेच दुःखापासून विमोचन होय. तृष्णानिरासाचा मार्ग कोणता ? बाह्य उपाधीपासून संज्ञापरिमाणू, संज्ञापरिमाणूपासून संज्ञाप्रवाह, संज्ञाप्रवाहांतून अहंभाव, अहंभावांतून व्यक्तिभाव अथवा आत्मा अशी जी भ्रमपरंपरा आहे ती ओळखून मानसप्रवाहाला उलट दिशा लावणें हाच तृष्णानिरास होय. तृष्णेचा निरास झालेला माणूस आपलें अस्तित्व म्हणजे संज्ञापरिमाणूंचा वाहता प्रवाह आहे हें चांगलें ओळखतो व त्याची जीवनासक्ती नाश पावलेली असते.

## निर्वाणाविषयींचें मौन

निर्वाणअवस्था म्हणजे काय ह्या प्रश्नावर बुद्धानें मौनच पत्करलें अशी सर्वसाधारण समजूत आहे. इतरांच्या मतें निर्वाण म्हणजे शून्यता अथवा अस्तित्वाचा अभाव होय. तर्काची गति कुंठित झाली म्हणून बुद्धानें मौन धारण केलें हा अत्यंत चुकीचा ग्रह आहे. उलट तें मौन बुद्धाच्या तर्कपद्धतीचेंच द्योतक होतें. माणसाला जें जें अस्तित्व अनुभवास येतें व पटतें तें इंद्रियांच्या द्वाराच शक्य असते. परंतु इंद्रियांचीं द्वारेंच नष्ट झाल्यावर जी अवस्था प्राप्त होणार तिचें इंद्रियांच्या भाषेंत वर्णन करणें कसें शक्य आहे ? निर्वाणानंतर तथागत कोठें असणार व कशा अवस्थेंत असणार हें देवांनादेखील अगम्यच राहणार असें जें बुद्धाचें वचन आहे त्याचें मर्म हेंच होय॰

बुद्धाची निर्वाणावस्था व उपनिषदांचे ब्रह्मन् ह्यामध्यें हाच मोठा भेद आहे. ब्रह्मन् हें कसल्यातरी प्रकारचें अस्तित्व आहे असा उपनिषदांचा आग्रह आहे. एवढेंच नाहीं तर ब्रह्मन् निरंतर, भेदातींत, अवस्थांतरशून्य आहे असा उपनिषदांचा निर्वाळा आहे. बुद्धास अनिर्वचनीय विषयाबद्दल अशा तऱ्हेची विश्वासपूर्ण वचनें मान्य नव्हतीं. देहपातानंतर तथागताचें काय होणार ह्या प्रश्नाचें उत्तर देणें त्यानें स्पष्टपणें नाकारलें.

## तर्ककठोर लीनता

सभोंवतालच्या विश्वांत त्याचप्रमाणें माणसाच्या मानसिक विश्वांत कांहींच स्थिर राहूं शकत नाहीं हें तत्त्वज्ञान तथागतालाहि लागूं आहे हें बुद्ध कधींच विसरला नाहीं. महापरिनिर्वाणाच्या समयीं सर्वांचीं म्लान मुखें पाहून बुद्धानें त्यांना शेवटचा उपदेश केला तो हाच मुद्दा विशद करण्याकरितां होता. प्रत्येकानें आपली मुक्ति आपल्या अविश्रांत प्रयत्नानेच साध्य केली पाहिजे. चर्मचक्षूंना दिसणारा तथागत इतर माणसाप्रमाणेंच मातीस केव्हांतरी मिळणारच. गौतमाचें शरीर हें जगाच्या तथागतस्थानीं नसून त्यानें दिलेला संदेश हाच जगाच्या अंतापर्यंत तेवणारा प्रदीप होय. एवढेंच नाहीं तर बुद्धाच्या पूर्वी अनेक बुद्ध झाले असतीलच व त्याच्या नंतरहि अनेक बुद्ध होणारच. तथागताच्या सेवेंत तत्पर असलेला आनंद तथागतास एकदां अभिवादनपूर्वक म्हणाला " आपल्या पूर्वी तथागत झाले असतील; आपल्या नंतरहि तथागत होतील. परंतु आपल्या इतक्या तोडीचा तथागत पूर्वी आणि नंतर असणें शक्य नाहीं. " बुद्धानें उत्तर केलें " आनंदा, तूं सिंहासारखी गर्जना केलीस हें खास... ! माझ्या पूर्वी जें बुद्ध अवतरले त्यांची तुला ओळख आहे काय ? " आनंदाला " नाहीं, भगवान " असें उत्तर देणें भागच होतें. बुद्ध पुन्हां म्हणाला,



अनुक्रमणिका






" माझ्या नंतर जे तथागत येणार आहेत त्यांची व तुझी भेट झाली आहे काय ? " आनंद गडबडून म्हणाला, "तें शक्यच नाहीं". तरी बुद्धानें आपल्या शिष्याची पाठ सोडली नाहीं; " तर मग मी सर्वांत श्रेष्ठ तथागत आहे ह्याला पुरावा काय ? " किती तर्ककठोर लीनता ही !

आजपर्यंत जगाच्या इतिहासांत कांहीं धर्मसंस्थापक व कित्येक धर्मप्रचारक होऊन गेले. त्यांत गौतम बुद्धाचें स्थान कसल्या तऱ्हेचें असावें हा चिन्तनीय विषय आहे. स्वामी विवेकानन्दांनी अमेरिकेंत दिलेल्या अत्यंत उत्कृष्ट व्याख्यानांत गौतम बुद्धावर दिलेलें व्याख्यान नितांत उत्कृष्ट होतें असेंच निःसंशय मत पडेल. त्या व्याख्यानांत विवेकानंदांनीं ह्या प्रश्नाला अप्रत्यक्ष रीत्या उत्तर दिलें आहे. जीझस ख्राईस्ट सारखे कांहीं धर्मसंस्थापक आपल्या विशाल हृदयानें मानवतेस भारून टाकतात. टॉमस ॲक्वेनास अथवा शंकराचार्यासारखे धर्मप्रचारक आपल्या विशाल बुद्धीनें मानवतेला गुंग करून टाकतात. परंतु विशाल बुद्धी आणि विशाल हृदय ज्याच्यांत एकत्रित झालीं आहेत असा धर्मसंस्थापक एकच एक होऊन गेला व तो गौतम बुद्धच होय. त्याच्या विशाल बुद्धीची झेप अध्यात्माच्या उत्तुंग शिखरापर्यंत लीलया विहार करीत होती; तर त्याच्या विशाल हृदयाचा ध्यास एकच एक म्हणजे मानवतेच्या दुःखास कारण काय व त्या दुःखांचा परिहार कसा होईल हा होता. महापरिनिर्वाणाच्या समयीं स्तब्ध उभे राहिलेले साल वृक्ष, संथपणें वाहणारी नदी आणि पसरलेला धवल चंद्रप्रकाश हीं गौतमाच्या व्यक्तिमत्त्वाच्या विशालतेचीं आणि भव्यतेचीं जड परंतु अमर साक्षीदारच होत.

---

## पूर्ण हिंदुत्वाचा शिक्का

एतद्देशज अनार्य असोत कीं बहिर्देशज अनार्य असोत, हिंदुस्थानांत त्यांना कायमचें रहावयाचें म्हणजे जात बनूनच त्यांनां हिंदुसमाज राहूं देत असे म्हणजे अनार्य बाह्य समाजाला जात बनवून त्याचा समावेश हिंदुसमाज आपल्यांत करून घेत असे. जात बनल्याशिवाय नागरिकत्वाचे किंवा ग्रामस्थाचे हक्क मिळत नसत, म्हणजे स्थानिक स्वराज्याच्या व साम्राज्याच्या छत्राचा आश्रय मिळत नसे. हिंदुसमाजांत बाह्यांचें राजकीय समावेशन, जातीचें रूप घेतल्यानंतर होत असे. बाह्य जातिसंस्थ झाले म्हणजे त्यांना त्यांच्या अनुरूप वृत्ति मिळून किंवा धंदा मिळून हिंदुसमाजांत व हिंदुदेशांत देशांतील राज्यछत्राखालीं सुखरूप रहातां येत असे. अशी जाति देशांत फार काल राहिली, एथील अभिजन बनली व हिंदुसमाजाचे सामान्य धर्म पाळूं लागली, म्हणजे त्या जातीला हिंदू हें अभिधान प्राप्त होई. नंतर त्या जातीचा जो देव असेल त्याची स्थापना हिंदूंच्या तेहतीस कोटी देवतामंडळांत होऊन, पूर्ण हिंदुत्वाचा शिक्का ह्या जातीवर कायमचा मारला जाई.

— इतिहाससंशोधक वि. का. राजवाडे.

( हिंदू समाजांत हिंद्वितरांचा समावेश )

प्रा. गो. चिं. सुर्वे

# नवबुद्धांची समस्या

## धर्मांतराचें कारण

बुद्धवासी डॉ. आंबेडकर यांनीं ता. १४ ऑक्टोबर १९५६ रोजीं नागपूर येथें बौद्ध धर्माचा स्वीकार करून सबंध भारतांत नवीन क्रांतीचीं बीजें पेरून ठेविलीं आहेत. त्यांच्याबरोबर हजारो अस्पृश्य बांधवांनीं स्वयंप्रेरणेनें बौद्ध धर्मांत प्रवेश केला. अनेक वर्षांपासून ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं असंख्य गरीब बांधवांना, कधीं सहानुभूति दाखवून, तर कधीं त्यांच्या अज्ञानाचा फायदा घेऊन, तर कधीं त्यांना आपल्या हिताचें आमिष दाखवून, ख्रिस्ती करवून घेतलें. परंतु एवढ्या मोठ्या प्रमाणावर आत्मप्रेरणेनें अलीकडच्या काळांत धर्मांतर झालें नव्हतें. याला प्रमुख कारण म्हणजे हिंदूंची समाजव्यवस्था होय. हिंदूंच्या प्रचलित समाजव्यवस्थेंत वर्ण आणि जाति यांच्या चौकटींत खालच्या जातींवर हजारों वर्षांपासून अन्याय होत आहे. हिंदूंच्या समाजव्यवस्थेंत व्यक्तीला स्थान नसून जातीला आहे हें विशेष आहे. जातिसंस्थेच्या या चक्रव्यूहांतून व्यक्तीची सुटका झाल्याखेरीज व्यक्तित्वाचा विकास आणि व्यक्तिस्वातंत्र्य या गोष्टी अशक्य आहेत. हिंदु धर्मांतील जातिसंस्थेच्या वर्तुळांमध्यें व्यक्तीला व्यक्ति म्हणून मान नाहीं. डॉ. आंबेडकर उदारमतवादी राजकीय तत्त्वज्ञानाचे आणि कल्याणकारी अर्थशास्त्राचे ( Welfare Economics ) पुरस्कर्ते असल्याकारणानें व्यक्तीला स्वतंत्र दर्जा प्राप्त झाल्याखेरीज सामाजिक प्रगति होणें शक्य नाहीं असें मानीत. त्यांनीं आपलें आयुष्य अस्पृश्यांवरील अन्यायाविरुद्ध, हिंदुधर्मांतील ज्ञानप्राप्तीच्या व ज्ञानार्जनाच्या मक्तेगिरीविरुद्ध, दीर्घकालीन परंपरेविरुद्ध आणि गरीब जनतेच्या आर्थिक शोषणाविरुद्ध असामान्य लढा देण्यांत घालविलें. शेवटीं हिंदुधर्मांतील जातीयवाद आणि शूद्र जातींवरील अन्याय दूर करण्यांस औषधी इलाज नाहीं हें जेव्हां पक्कें समजलें तेव्हां त्यांनीं शस्त्रक्रिया करून हिंदुसमाजाचा एक भाग बाहेर काढला आणि बौद्ध धर्म स्वीकारून नवबुद्धसमाज निर्माण केला. वास्तविक एक भाग सोडून गेला तरी हिंदुधर्मीयांना त्याची दिक्कतहि वाटत नाहीं. याला कारण तरी काय ? कीं हिंदुधर्मीय लोक इतके उदासीन बनले आहेत ?

## निधर्मी राज्य आणि निधर्मी राजकारण

नवबुद्धांच्या प्रश्नांमध्यें केवळ हिंदुधर्माला आणि समाजव्यवस्थेलाच नाहीं तर सबंध हिंदी जनतेला आव्हान आहे. डॉ. आंबेडकर हे महान् द्रष्टे होते. त्यांचीं अंतर्गत व आंतरराष्ट्रीय राजकारणांतील अनेक भाकितें खरीं ठरलीं आहेत. त्यामुळें आपल्या परिनिर्वाणापूर्वीं त्यांनीं केलेल्या बौद्धधर्म-स्वीकाराला फार महत्त्व आहे. ते अजून कांहीं वर्षें जगते तर त्यांच्या मनोयोजनेप्रमाणें सर्व कांहीं झालें असतें. परंतु आतां मात्र यापुढील सर्व जबाबदारी शे. का. फेडरेशनच्या पुढाऱ्यांवर पडली आहे. ही नवीन जबाबदारी पार पाडण्यास नवीन पुढारीपण कितपत यशस्वी होईल हें भविष्यकाळच ठरवूं शकेल. मात्र या नवीन धर्मांतराच्या लाटेंतून



अनुक्रमणिका






भारतीय राजकारणाचें नवीन धार्मिक अधिष्ठान नाहीसें करणारी समाजक्रांतीची लाट तरी निर्माण होईल किंवा परंपरागत समाजव्यवस्था अधिक बळकट होऊन सनातनी वृत्ति बळावेल.

जरी भारत हें एक निधर्मी राज्य म्हटलें जातें तरीसुद्धां राजकीय जीवनाचें धार्मिक अधिष्ठान नष्ट झालेलें नाहीं. धर्म आणि राजकारण यांचा अजूनहि निकटचा संबंध आहे. राज्य निधर्मी असलें म्हणजे राजकारण निधर्मीच असेल असें म्हणतां येत नाहीं. मात्र राजकारण निधर्मी असेल तर सर्वांच्या सर्व गरजा भागल्या नाहींत तरी व्यक्तीला व्यक्ति म्हणून मान असेल आणि न्याय मिळेल. कदाचित् असेंहि म्हणतां येईल कीं सर्वांच्या सर्व गरजा भागत नाहींत म्हणूनच राजकारण निधर्मी होऊं शकत नाहीं आणि अन्याय दूर होत नाहीं. यास्तव निधर्मी राजकारण आणि आधिभौतिक प्रगति व त्या दृष्टीनें टाकलेलीं पाउलें यांचा परस्पर संबंध असला पाहिजे. म्हणून निधर्मी राजकारण समाजाची घडी बदलल्याखेरीज व व्यक्ती-व्यक्तीच्या परंपरागत मनोवृत्तींत बदल झाल्याखेरीज अस्तित्वांत येणें शक्य नाहीं. देशांतील राजकारण निधर्मी स्वरूपाचें असेल तरच खरीखुरी लोकशाही नांदू शकेल. तेव्हां खऱ्याखुऱ्या लोकशाहीसाठीं आपली बौद्धिक आणि सारासार विचाराची पातळी इतकी उंचावली पाहिजे कीं धर्म ही बाब राजकारणांत गौण ठरून निधर्मी राजकारण सुरू व्हावें. सध्यां तरी हें शक्य दिसत नाहीं. भारतांत प्रामुख्यानें हिंदु धर्माचे लोक असले तरी इतर धर्माचे लोक आहेतच आणि शिवाय हिंदु समाजहि एकजिनसी नाहीं. यामुळेंच भारतासारख्या लोकशाही राज्यांत निवडणुकींतील मतदान बव्हंशीं जातीय दृष्टिकोणांतून होतें; व राजकीय पक्षांचे उमेदवारहि विशिष्ट मतदारसंघांतील विशिष्ट जातीच्या किंवा धर्मीय लोकांच्या प्राबल्यावर निश्चित केले जातात. भारतांतील राजकारण आणि धर्म व जाति यांचा निकटचा संबंध टिकून राहिला आहे. विशिष्ट समाजव्यवस्थेच्या चौकटींतून बाहेर पडण्याची आपली तयारी नाहीं किंवा आपल्यात तशी कुवत नाहीं. वर्णाश्रम समाजव्यवस्था वा जातिसंस्था या सरंजामी मनोवृत्तीच्या व पद्धतीच्या निदर्शक आहेत. या समाज-संस्था आजच्या युगांत पूर्णतया निरुपयोगी आहेत. इतकेंच नव्हे या टिकून राहिल्या तर प्रगति खुंटेल. आपण निधर्मी राज्याचा आणि लोकशाहीचा बाहेरून कितीहि मोठा देखावा करीत असलों तरी हिंदुकोड बिलासारखे कायदे पास होऊन अंमलांत येऊं शकत नाहींत किंवा भारतांतील जातीयता व अस्पृश्यता नष्ट होऊं शकत नाहीं. हिंदुधर्मांतील वरच्या जातींत जातीयवाद जितका कणखर आहे तितकाच मधल्या जातींत व खालच्या जातींत आहे. प्रचलीत हिंदुधर्म-समाजव्यवस्था आणि लोकशाही एकत्र नांदू शकत नाहींत; कारण राजकीय लोकशाही सामाजिक व आर्थिक लोकशाहीच्या पायावरच उभारली जाते व दीर्घकाल टिकते. यासाठींच डॉ. आंबेडकरांनीं सामाजिक समतेच्या तत्त्वावर आधारलेल्या बौद्ध धर्माचा स्वीकार केला व त्यांच्याबरोबर असंख्य अस्पृश्य बांधवांनींहि बौद्ध धर्म स्वीकारला.

## सामाजिक मागासलेपणा आणि आर्थिक स्थिति

हिंदु समाजव्यवस्था आणि संस्कृति प्रगमनशील नाहीं. ह्या समाजव्यवस्थेंत आर्थिक विकास घडून येणें अशक्य आहे. या समाजव्यवस्थेंत व्यक्तीला व्यक्ति म्हणून प्रेरणा देणारी शक्तीच उरली नाहीं. यासाठीं हिंदु म्हणवून घेणाऱ्यांनीं या गोष्टीकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं. तथापि हिंदूंची मनोवृत्ति या बाबतींत उदासीनतेची आहे. याला कारण म्हणजे हिंदुधर्मांतील शिस्तीचा अभाव, महत्त्वाच्या सामाजिक घटनांकडे दुर्लक्ष करण्याची वृत्ति आणि ब्राह्मण वर्गाकडून गेलेलें पुढारीपण होय. ब्रिटिश











अंमलाखाली जी नवीन शिक्षणपद्धति आली, लोकशाही वृत्तीला पोषक अशा ज्या पाश्चात्त्य कल्पना आल्या त्यामुळें ब्राह्मणांची पुढारीपणाची मक्तेदारी नष्ट झाली. हिंदुधर्मांत आतां कोणत्याहि बाबतींत प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष सक्ती उरलेली नाहीं. देवळांत जा अगर जाऊं नका, लग्न वैदिक पद्धतीनें करा अगर रजिष्टर पद्धतीनें करा, देवावर विश्वास ठेवा अगर ठेवूं नका; सर्व कांहीं हिंदु धर्मांत चालतें म्हणजे सहन केलें जातें. कारण समाजांत अजूनहि केवळ व्यक्ति हा घटक नसून "कुटुंब व जाति" हे घटक आहेत. म्हणून कांहीं गोष्टी पसंत नसूनहि कुटुंबाच्या पूर्वापार रूढीमुळें, कुटुंबातील इतर माणसांच्या दडपणामुळें कराव्या लागतात. कुटुंब व जाति हे घटक असल्यामुळें जातींत अगर कुटुंबांत कांहीं नास्तिक वृत्तीचीं माणसें असलीं तरी चालतात. मात्र स्त्रीपुरुषाचे विवाह जातींतल्या जातींत झाले पाहिजेत हें कटाक्षानें पाहिलें जातें. कारण हिंदुधर्म-समाजव्यवस्थेनुसार कोणत्याहि व्यक्तीला आपल्या जातीच्या बाहेर समाजजीवन असणें संभवत नाहीं. जातीखेरीज दुसरी कोणतीहि संस्था नाहीं कीं जिच्याभोंवतीं व्यक्तीला समाजजीवन जगतां येईल.

अशा प्रकारें व्यक्तीचें समाजांतील स्थान जन्मावरुन ठरत असल्यामुळें खालच्या जातींत जन्मलेल्या व्यक्तीचे समाजांतील स्थान नेहमींच खालचें राहाणार. त्यामध्यें सुधारणा होणें अशक्य आहे. या गोष्टीचीच रुखरुख डॉ. आंबेडकरांना लागली होती. डॉ. आंबेडकर हे धार्मिक मनोवृत्तीचे होते.

डॉ. आंबेडकरांचा जसा हिंदुधर्मसमाजव्यवस्थेला विरोध होता तसाच साम्यवादालाहि होता. कारण हिंदु-समाजव्यवस्थेंत व्यक्तीला व्यक्ति म्हणून स्थान नाहीं व्यक्तीच्या समुदायाला— जातीला स्थान आहे आणि जातीच्या अनुषंगानें व्यक्तीचें स्थान ठरतें. तसेंच साम्यवादी तत्त्वज्ञानांत व्यक्तीला स्वतंत्र स्थान नाहीं. व्यक्ति समुदायामध्यें (collectivity) विलीन झालेली आहे. परंतु १९५१ पासून डॉ. आंबेडकर साम्यवादाचे विरोधक असून भाषा मात्र साम्यवाद्यांची वापरीत. डॉ. आंबेडकर "सामाजिक" आणि "आर्थिक" या बाबतींत नेहमींच फारकत करीत असत. मार्क्सवाद्यांच्या आर्थिक कार्यकारणमीमांसेवर (Economic Determinism) त्यांचा विश्वास नव्हता. आर्थिक परिस्थिति सुधारली म्हणजे सामाजिक प्रश्न आपोआप सुटतील; आणि म्हणूनच आर्थिक समतेच्या पायावर इतर क्षेत्रांत आपोआप समता निर्माण होईल असा मार्क्सवाद्यांचा दंडक आहे. मार्क्सवाद्यांच्या मतें समाजामध्यें न्यायाचें राज्य सुरू करण्यासाठीं उत्पादनांचीं साधनें सामाजिक मालकीचीं करून, शोषित व श्रमिक जनतेचें शोषण थांबवून आर्थिक समता निर्माण करणें आवश्यक आहे. डॉ. आंबेडकरांच्या मतें केवळ आर्थिक समता निर्माण करून सामाजिक प्रश्न सुटत नाहींत. यासाठींच अस्पृश्य समाजाचे सामाजिक प्रश्न प्रथम सुटले पाहिजेत; आर्थिक प्रश्न मागाहून किंवा त्याबरोबर सुटतील. यामुळें डॉ. आंबेडकरांमधील समाजशास्त्रज्ञ अर्थशास्त्रज्ञापेक्षां अधिक प्रखर आणि संवेदनाशील होता असें म्हणावेसें वाटतें. वास्तविक धर्मांतरानें अस्पृश्य जनतेंत जरी नवीन आत्मविश्वास आणि उत्साह निर्माण झाला असला तरीसुद्धां त्यांचें समाजांतील स्थान उंचावलें आहे आणि त्यांचे प्रश्न सुटले आहेत असें नाहीं. कारण "सामाजिक" आणि "आर्थिक" यांचा अगदीं मार्क्सवाद्यांप्रमाणें निकटचा कार्यकारण भाव मानतां येत नसला तरी त्यांची संपूर्णत: फारकतहि करतां येत नाहीं. प्रत्येक सामाजिक प्रश्नाला आर्थिक बाजू असते आणि प्रत्येक आर्थिक प्रश्नाला सामाजिक पार्श्वभूमीहि असते. यामुळें नवबुद्धांपुढें आज चमत्कारिक पेंचप्रसंग निर्माण झाला आहे. डॉ. आंबेडकरांना अस्पृश्यांचे प्रश्न बव्हंशीं सामा-








जिक स्वरूपाचे वाटल्यामुळें समाजव्यवहारांतील विविध क्षेत्रांत शिरण्याची व काम करण्याची समान संधि आणि श्रमाला योग्य वेतन मिळालें म्हणजे न्यायाचें राज्य निर्माण होईल असें वाटे. परंतु भांडवलशाही राज्यांत समान संधि मिळूनहि खात्रीनें रोजगार मिळेलच असें नाहीं. आणि अशी खात्री नसल्यामुळें कामावर योग्य माणसाचीच नेमणूक होईल हेंहि सांगतां येत नाहीं. याशिवाय " योग्य वेतना"च्या नांवाखालीं कोणत्याहि प्रकारची आर्थिक शोषणा होऊं शकते. म्हणून आजचे समाजाचे प्रश्न केवळ " सामाजिक " नसून " आर्थिक " स्वरूपाचेहि आहेत; आणि हे प्रश्न जसे नवबुद्धांना तसे इतर सर्व हिंदी लोकांना आणि विशेषतः शोषित जनतेला भेडसावीत आहेत. तरीसुद्धां नवबुद्धांच्याच प्रश्नांचा विचार करण्यांत एक विशेष आहे. एक तर नवबुद्ध लोक व अस्पृश्य समाज हा सर्वांत अधिक पीडला गेलेला आहे; आणि दुसरें म्हणजे त्यांच्यांतील वैफल्याची भावना यापुढें त्यांना उदासीनतेकडे न नेतां अधिक जोम आणि तेज निर्माण करून समाजक्रांतीला पोषक अशी पार्श्वभूमी निर्माण करील. त्यांच्यामधील वैफल्याची भावना त्यांना साम्यवादाकडे नेईल. वास्तविक डॉ. आंबेडकरांनीं आपल्या प्रभावानें या अस्पृश्य जनतेला साम्यवादापासून दूर ठेविलें आणि तेणेंकरून हिंदुधर्माला उपकृतच करून ठेविलें आहे; यासाठीं नवबुद्धांचें आव्हान स्वीकारतांना खरा प्रश्न हिंदुधर्म कीं बौद्धधर्म हा नसून प्रामुख्यानें साम्यवाद अथवा समाजवाद कीं भांडवलशाही हाच आहे. म्हणूनच नवबुद्धांचे प्रश्न हे सर्व हिंदी जनतेचे प्रश्न आहेत.

## नवबुद्ध आणि सरकारच्या खास सवलती

भारत सरकार व राज्यसरकारें अनुसूचित जाति, मागासलेल्या जमाती व वन्यजमाती यांना वेगवेगळ्या क्षेत्रांत सवलती व कांहीं जागा राखीव म्हणून ठेवीत असतात. या सवलती त्या त्या जमातींना केवळ " आर्थिक दैन्य " या कारणामुळें नसून " सामाजिक मागासलेपणा"मुळें देण्यांत येतात. केवळ आर्थिक दैन्याच्या कारणावर या सवलती मिळाल्या असत्या तर त्या व्यक्ति किंवा कुटुंब यांना मिळाल्या असत्या; मग त्या व्यक्ति किंवा तीं कुटुंबें कोणत्याहि धर्माचीं, पंथाचीं अगर जातीचीं असोत. परंतु या सवलती विशिष्ट जातींना आहेत. वास्तविक त्यांचा सामाजिक मागासलेपणा नाहीसा झाल्यावर त्यांना खास सवलती असणार नाहींत. अस्पृश्य लोकांनीं बौद्ध धर्म स्वीकारल्याबरोबर त्यांचा मागासलेपणा तावडतोब नाहींसा झाला असें नाहीं. त्यांचा सामाजिक मागासलेपणा नाहींसा करून त्यांना समपातळींत आणण्याच्या दृष्टीनें धर्मांतर हें पहिलें पाऊल आहे. म्हणून त्यांना कांहीं काळपर्यंत खास सवलती असणें युक्त आहे. त्या सवलतींचा नवबुद्धांनी उपयोग करून घेणें अगर न घेणें हा त्यांचा प्रश्न आहे. बौद्ध धर्मांतहि नवबुद्ध व जुने बुद्ध तसेच अस्पृश्य जमातींतून धर्मांतर केलेले व सवर्ण जातींतून धर्मांतर केलेले असे फरक असणार. नवबुद्धांना सरकारी खास सवलतींचा उपयोग करून घेण्यासाठीं इतर बौद्ध धर्मीय लोकांपासून निराळें असावें लागणार; कारण अस्पृश्य जमातींतून नवबुद्ध झालेले असल्याशिवाय सवलती मिळणार नाहींत. अर्थात् बौद्धधर्मीय लोकांत मागासलेले व बिनमागासलेले असे दोन वर्ग निर्माण झाले म्हणजे बौद्ध धर्माचें आकर्षण व समतेची भावना नष्ट झाल्यासारखें होणार आहे. बौद्ध धर्मांतील सामाजिक समतेची प्रतिष्ठा कायम राखायची कीं मागासलेले म्हणवून खास सवलतींचा उपयोग करून घ्यावयाचा हा नवबुद्धांपुढें प्रश्न आहे. त्यांनीं बौद्ध धर्माची प्रतिष्ठा आणि त्यामधील समतेची भावना कायम








अनुक्रमणिका

राखायचें टरविलें तर आपले आर्थिक प्रश्न सोड-विण्यासाठीं त्यांना निराळया मार्गाचा अवलंब करावा लागेल. म्हणजेच त्यांना इतर शोषित जनतेच्या-शेतकामगार, गिरणीमजूर, बांधकाम-कामगार वगैरे श्रमिक लोकांच्या प्रश्नांबरोबर आपले प्रश्नहि सोड-विले पाहिजेत. यासाठीं साम्यवादी किंवा समाजवादी पक्षाबरोबर हातमिळवणी केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. साम्यवादी व इतर पक्ष या परिस्थितीचा योग्य तो फायदा घेणारच. मात्र प्रचलीत सरकारनें योग्य काळजी घेऊन सामाजिक योजनात्मक प्रयत्न केले तर संभाव्य घटना टळतील. यासाठीं केवळ आर्थिक नियोजनानें भागणार नाहीं. व्यापक सामाजिक नियोजनाची आवश्यकता आहे; त्या योगानें आर्थिक विकासाच्या कार्यालाहि जोम येईल.

## सामाजिक नियोजन

भारतामध्यें पहिल्या व दुसऱ्या पंचवार्षिक योजनांनुसार आर्थिक नियोजनात्मक प्रगतीचे प्रयत्न सुरू झाले आहेतच. परंतु आर्थिक नियोजन हा व्यापक सामाजिक नियोजनाचा एक भाग असला पाहिजे. कोणत्या प्रकारचा समाज निर्माण करावयाचा हें उद्दिष्ट गांठण्याच्या दृष्टीनें एकंदर आर्थिक नियोजन झालें पाहिजे. प्रचलित समाजव्यवस्था कायम ठेवून आर्थिक विकास घडवून आणणें अवघड आहे आणि तो झालाच तरी समाजव्यवस्थेंतील दोष नाहींसे होत नाहींत. अन्याय, वशिलेबाजी, लांचलुचपत व समाजनिर्मित गुलामगिरी परंपरेनें चालू राहातात. हिंदुधर्मांतील उच्चनीच भाव केवळ कायदे करून किंवा सवलती देऊन नष्ट होण्यासारखा नाहीं. राजकीय लोकशाहीचीं आर्थिक व सामाजिक हीं दोन विशिष्ट अंगें आहेत. तीं एकमेकांपासून विभक्त करतां येत नाहींत. आर्थिक योजनेचीं उद्दिष्टें व आर्थिक विकास साधण्यासाठीं कांही सामाजिक कार्यक्रम हातीं घेणें आवश्यक वाटत नसलें तरीहि व्यापक सामाजिक नियोजनाच्या दृष्टीनें त्याला महत्त्व आहेच.

---

## राष्ट्रीय एकजिनसीपणा

युनायटेडस्टेट्समध्यें इंग्रज, आयरिश, फ्रेंच, जर्मन, स्विस, इतालियन, पोलिश, ग्रीक, रशियन, हंगारियन, डेन, स्विडिश, वगैरे सर्व राष्ट्रांतील लोक स्वभाषा दोन तीन पिढ्यांत सोडून देतां देतां एक-जिनसी बनत आहेत. तोच प्रकार यूरोपांत अनुकरणानें व इतर बलवत्तर कारणांनीं होईल. हिंदुस्थानांतील बंगाली, हिंदी, पंजाबी, गुजराथी, मराठी, कानडी, तेलगू, तामील, वगैरे सर्व हिंदूराष्ट्रें अमेरिकेंतल्या प्रमाणेंच भाषाभेद सोडून शेकडों वर्षांनीं एकजिनसी बनतील. हा राष्ट्रीय एकजिनसी-पणा येण्याच्या अगोदर एकभाषा बोलणाऱ्या एकेक राष्ट्रांतील पोटजाति व संकरजाति मोडून त्या त्या राष्ट्रांतील सर्व समाज एकजिनसी होईल. हा प्रकार आपल्या डोळयादेखत हिंदुस्थानांतील सर्व राष्ट्रांत आजमित्तीस चालू आहे. तो जोरानें व धिम्मे-पणानें चालण्यास प्रोत्साहन देणें आपल्या हिताचें आहे.

— इतिहास संशोधक वि. का. राजवाडे

( हिंदूसमाजांत हिंद्वितरांचा समावेश )












प्रा. सुभाषचंद्र अक्कोळे

# पं. मेघाकृत यशोधरचरित्र

## यशोधराख्यानाची लोकप्रियता

कथावाङ्मयाच्या अभ्यासकांना यशोधराचें कथानक नवीन नाहीं. राजा यशोधर आणि त्याची राणी अमृतमति यांची ही कथा जैन वाङ्मयांत अतिशय लोकप्रिय आहे. या कथानकावर वाङ्मयहि तितकेंच विपुल आहे. संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश, जुनी गुजराती, जुनी हिंदी, कन्नड, तामील अशा सर्वच भाषांमध्यें या यशोधराच्या कथानकावर साहित्य उपलब्ध आहे. भांडारकर रिसर्च इन्स्टिट्यूट तर्फें प्रसिद्ध झालेल्या 'जिनरत्न कोशांत' डॉ. एच्. डी. वेलणकर यांनी यशोधरचरित्रावरील उपलब्ध ग्रंथांची यादी जवळजवळ २२ दिली आहे. त्याचप्रमाणें डॉ. पी. एल्. वैद्य यांनी जसहरचरिउच्या प्रस्तावनेंत "Popularity of Jasahara with the Jain Writers." या मथळयाखालीं निरनिराळया भाषांतील यशोधर चरित्रांची ही संख्या २९ दिली आहे. उपलब्ध अशी ही ग्रंथसंख्या या कथानकाची श्रेष्ठता आणि लोकप्रियता सिद्ध करण्यास पुरेशी आहे.

दहाव्या शतकापासून या कथानकावर वाङ्मय लिहिलें जात आहे. त्यापूर्वीच ही कथा लोकप्रिय झाली असली पाहिजे. वासवसेनानें आपल्या यशोधरचरित्रांत प्रभंजन व हरिषेण यांचा याच चरित्राचे लेखक म्हणून उल्लेख केला आहे. याच प्रभंजनाचा उल्लेख कुवलयमालाकार उद्योतनसूरी (इ. स. ७७७) 'प्रभंजनें राजर्षि' म्हणून करतात. या वरून ८ व्या शतकापूर्वी ही कथा लिहिली गेली होती यांत शंका राहात नाहीं.

सोमदेव, हरिषेण, वादिराज, वासवसेन, सकलकीर्ति, सोमकीर्ति इत्यादी आचार्यांनी संस्कृतांत ही कथा लिहिली. हरिभद्र, पुष्पदंत यांनी प्राकृत व अपभ्रंशांत त्यावर रचना केली. जन्न कवीचें यशोधरचरित्र प्राचीन कन्नड वाङ्मयांतील एक अपूर्व रत्न समजलें जातें. जुन्या हिंदींत पंडित लक्ष्मीदास, पं. गौरवदास यांनी हें चरित्र लिहिलें आहे. यांतील लक्ष्मीदासाचा काल वि. सं. १७८१ असून गौरवदासाचा काळ संवत १५८१ आहे.

जुन्या गुजरातींत जिनचंद्रसूरी (१६ वें शतक) यांचें यशोधर-चरित्राशिवाय देवेंद्र, लावण्यरत्न (संवत् १५७३), मनोहरदास (सं. १६७६), ब्रह्मजिनदास (सं. १५२०), ज्ञानदास (सं. १६७०) इत्यादिकांची रचना उपलब्ध आहे.

## प्राचीन मराठींतील यशोधर-चरित्रें

जुन्या मराठींत यशोधर-चरित्रावर कांहीं रचना आहे किंवा नाहीं या विषयीं अलिकडे प्रयत्न करतां

---

१ प्रभंजनादिभिः पूर्वं हरिषेणसमन्वितैः ।
यदुक्तं तत्कथं शक्यं मया बालेन भाषितुम् ॥

२ सत्तूण जो जसहरो जसहरचरियेण जणवए पयडो ।
कलिमल पभंजणो च्चिय पभंजणो आसि रायरिसी ॥

३ भांडारकर रिसर्च इन्स्टिट्यूटमधील प्रत, नं. ६८१

४ हिन्दी जैन साहित्यका इतिहास – पं. कामताप्रसाद जैन, पान ६८








कांहीं माहिती उपलब्ध झाली. ' सन्मति ' मासिकांत प्रा. विद्याधर जोहरापुरकर यांचा भट्टारक संप्रदायाच्या एका लेखांत ' नागो आया 'कृत यशोधरचरित्राचा उल्लेख आला. त्यानंतर तिकडे लक्ष वेधलें.

जुन्या मराठींत यशोधरचरित्रावर आजपर्यंतच्या प्रयत्नांत तीन वेगवेगळ्या कृति उपलब्ध झालेल्या दिसतात. त्याविषयीं येथें संक्षिप्त माहिती देत आहे.

(१) पं. मेघाकृत यशोधरचरित्र – वऱ्हाडमधील कारंजा येथें सेनगण मंदिराच्या ग्रंथभांडारांत गंगादासकृत यशोधरचरित्र आहे असें समजल्यावरून पत्रव्यवहार करून जी हस्तलिखित प्रत बोलाविली ती गंगादासकृत न निघतां पं. मेघाकृत निघाली. प्रतीवर गंगादासकृत असें चुकून लिहिलें गेलें आहे. मेघाकृत यशोधराची ( चरित्राची ) दुसरी एक हस्तलिखित प्रत नागपुर येथें सेनगण मंदिरांत होती. ती प्रा. किल्लेदार यांच्या कृपेनें प्राप्त झाली. याच ग्रंथाची तिसरी हस्तलिखित प्रत हिंगोलीचे श्री. जयकुमार दोड्डल वकील यांच्याकडून मिळाली. या लेखांत पुढें मुख्यतः मेघाकृत यशोधरचरित्राचा परिचय देण्याचा मानस असल्यानें या परिच्छेदांत केवळ इतकी माहिती पुरी आहे.

(२) गुणनंदि गुणसागरकृत यशोधरचरित्र– याची हस्तलिखित प्रत मिळाली नाहीं. " जशोधर पुराण " या नांवानें हा ग्रंथ पुराणाकार छापला आहे. " हा ग्रंथ रा. रा. बाळाप्पा घट्याप्पा आलासे राहणार कुरुंदवाड यांनी श्रावकांचे उपयोगाकरितां कुरुंदवाड येथें आपल्या ' जैनभूषण' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला " असें छापलें आहे. छापील पुराणाचीं पानें ९४ आहेत.

प्रशस्तींत –

" हें रचिलें मोरंबपुरस्थानीं ।
माळा तीर्थ चैतालय भुवनीं ।
श्री मूळसंघ बळात्कारगणीं ।
धर्मभूषण श्री गुरु ॥
त्याचा शिष्य गुणनंदी गुणसागर ।
जिनदेव गुरु भक्तिनिर्भर ।
या जशोधर रायाची कथा सुंदर ।
संपूर्ण केली ॥ २०१ ॥

इतिश्री जशोधर चरित्र अख्यान अष्टम संधी ॥ ८ ॥

संपूर्णमस्तु शुभभवत् एकून वोवी १३१६

जशोधर चरित्राणां लिख्यते नसिवात्मजं अत्रद्धोथ सुबद्धं च क्षमस्व सुजनो मम । शके १६९५ विजयनाम संवत्सरें दशमी गुरुवासरें शुभतारयोः श्रावणमास पवित्रे च लिख्यतेत्तद्विज शुभं ॥ "

या प्रमाणें छापलें आहे. यांतील ग्रंथकर्त्याचा व प्रतिकर्त्याचा भाग स्पष्ट ओळखण्यासारखा आहे. शके १६९५ हा काळ ग्रंथलेखनाचा नसून प्रति करण्याचा आहे. ग्रंथरचनेचा काळ सुमारें एक शतक मागें जातो. कारण गुणनंदी ज्या धर्मभूषण गुरूचा उल्लेख करतात ते धर्मभूषण बलात्कार-गणाचे आहेत. आणि बलात्कार-गणाचे धर्मभूषण भट्टारकांचे उल्लेख शक १५७२ पासून शक १५९७ पर्यंतचे मिळतात. त्यानंतर कोणतेहि धर्मभूषण कारंजा गादीवर झाले नाहींत. म्हणजे या ग्रंथाचा काळ शके १५९५ च्या आसपास समजायला हरकत नसावी.

( ३ ) नागो आयाकृत यशोधर-चरित्र– या ग्रंथाचें संपादन प्रा. विद्याधर जोहरापुरकर, नागपुर हे करीत आहेत. याविषयीं म. सा. पत्रिका वर्ष २९, अंक ११६ मध्यें त्यांनी जी माहिती दिली आहे ती सारांश रूपानें अशी आहे. " लेखकानें कथेच्या शेवटीं लहानशी प्रशस्ति जोडली आहे,[५]

---

५ वैराट देसामध्यें कोट नगर । तेथ आदिनाथ असे जगप्रसिद्ध । सिद्ध तीर्थंकर जाणा ॥
सरस्वती मातेच्या प्रसादें । माणिकसेन गुरूच्या आल्हादे । नागो आया म्हणे आनंद ।
यसोधर ग्रंथ ॥ परिच्छेद ४











पण कालनिर्देश केलेला नाहीं. कारंजा येथील पट्टाचार्य माणिकसेन यांचा तो शिष्य होता. या माणिकसेनांनी शक १४२४ मध्यें स्थापित केलेली एक मूर्ति नागपूरच्या सेनगणमंदिरांत आहे. यावरून १६ व्या शतकाचा पूर्वार्ध हा नागो आयाचा काल वाटतो. या कथेची एक प्रत कारंजा येथील बलात्कारगण मंदिरांत आहे....... चार परिच्छेदांत मिळून २६१ ओव्या आहेत. ''

याप्रमाणें पं. मेघा, गुणनंदिगुणसागर व नागो आया अशा तीन वेगवेगळ्या कवींनी यशोधरचरित्रावर काव्यरचना केली आहे.

### पं. मेघाकृत यशोधर चरित्राचा —विस्तृत परिचय

या ग्रंथाच्या तीन हस्तलिखित प्रती उपलब्ध असल्यांचा उल्लेख वर आलाच आहे.

कारंजा प्रतींत शेवटीं ही प्रत तयार करण्याचा काळ व स्थळ आणि हेतु खालीलप्रमाणें देण्यांत आले आहेत. " सके १६१४ आंगीरनाम संवत्सरे आस्वनमास शुक्लपक्ष सुद १३ लिखितं वछगुल्म नगरे ( वासीम ) श्री आदीश्वर चैत्यालये । श्री मूलसंघे पुष्कर गच्छे सेनगणे, भट्टारक विरसेन तत्पटे लक्ष्मीसेन सीष्य आचारजी वृषभसेन सीष्य आदीसागर ब्रह्मपटणार्थ पुस्तक लिखीतं । हस्त अक्षर

।। भट्टारक श्री जिनसेन सिष्य बाई हेममतीस लिहून दिला. बाई पटणार्थ पुस्तकं।। मंगलं भवतु ।।''

यावरून ही प्रत शके १६१४ मध्यें तयार केलेल्या प्रतीवरून नंतर तयार करण्यांत आली आहे हें स्पष्ट आहे. नागपूरच्या प्रतींत असा कोणताहि उल्लेख नाहीं. हिंगोलीच्या प्रतींतील पुष्पिका अशी आहे. " इति पंडित मेघाविरचिते श्री जसोधर चरित्र संपूर्णे ।। शुभं भवतु । सके १६९४ पाल्गुण सुद्ध ५ ।। लिखितं श्वहस्ते ब्रह्म श्री नेमसागरजी मिदं पुस्थकं ''

ग्रंथाची ओवीसंख्या एकूण १२७० असून अधिकार ५ आहेत. तीनहि प्रतींत ओवीसंख्या समान आहे.

**कवी मेघा** — कारंजा, नागपूर व हिंगोली अशा तीनहि प्रतींत ग्रंथसमाप्ति करतांना " ईति पंडित मेघाविरचिते श्री जसोधरचरित्र संपूर्ण समाप्त । " असें लिहिलें आहे. कवि मेघा हा ' पंडित मेघा ' म्हणून त्यावेळीं ओळखला जात असला पाहिजे. स्वतःचाहि उल्लेख ' मेघा ' म्हणूनच तो करतो. त्यांतच स्वतःचा गुरू म्हणून ब्रह्मचारी शांतिदासाचा उल्लेख करतो. आपल्या गुरूविषयीं त्याला अत्यंत आदराची भावना असून त्यांच्याच कृपेनें ही धर्मकथा आपण सांगत आहोंत, अशी त्याची दृढ श्रद्धा आहे. गुरूच्या व स्वतःच्या नांवांशिवाय मेघानें बाकीच्या कोणत्याहि गोष्टीचा उल्लेख केला नाहीं. नागपूर आणि कारंजा येथील भट्टारकांच्या गाद्यांचा व त्यांच्या शिष्यमंडळींचा इतिहास पूर्णपणें जेव्हां प्रकाशांत येईल त्यावेळीं कवि मेघाच्या चरित्रासंबंधीं कांहीं माहिती मिळूं शकेल. या कवीचा काळ ठरविणें हीहि अत्यंत कठिण समस्या आहे. कारंजाच्या प्रतींतील शके १६१४ चा उल्लेख हा

---

६. जो ब्रह्मचारी सांतिदासु । तेणें मज साहसु ।
केला कथेचा प्रकासु । मेघा म्हणे ।। ७० ।। ४ अधि.
नमन शांत ब्रह्मचरणी । जेणें मज क्षमा करूणी ।
आपुला वचनी । ओलखविला धर्ममर्णी ( र्नी ) ।। १९
प्रसादु मज त्याचा । मर्मु जाणींतला धर्माचा ।
आरंभु केला कथेचा । सुकृताकारणें ।। २० ।। १ अधि.








रचनाकालाचा नाहीं. तो प्रतिलेखनाचा आहे. मेघाचे गुरु ब्रह्म शांतिदास यांचाहि काळ नक्की ठरविण्याइतका सबळ पुरावा हातीं नाहीं. प्रा. जोहरापुरकर उपर्युक्त म. सा. पत्रिकेंतील लेखांत ब्रह्मजिनदासाच्या एका शिष्याचें नांव शांतिदास होतें असें लिहितात. मेघाचे गुरू व ब्रह्मजिनदासाचे शिष्य हे दोन्ही शांतिदास जर एक असतील तर या ग्रंथाचा काळ सोळाव्या शतकाचा पूर्वार्ध मानावा लागेल असा त्यांचा कयास आहे. पण या ग्रंथाची भाषा व घाटणी पाहतां ही रचना १६ व्या शतकांतली वाटत नाहीं. प्रथमा विभक्तींतील 'उ'कार व 'ओ'कार आणि 'अबोधां जिवांचे माव्हर' या सारखे प्रयोग यावरून ही भाषा 'बहामनीकालीन' या सदरांत येईल असें वाटतें. ग्रंथरचनेचा काळ १४ व्या शतकाचा असावा. पण यास जोपर्यंत उपलब्ध पुरावा नाहीं तोपर्यंत हा प्रश्न असाच अनिर्णित राहणार.

## संक्षिप्त कथानक

यशोधरचरित्र हें कथानक काय आहे याची कल्पना यावी म्हणून खालील भाग देत आहे.

अधिकारु १ – "धर्माचें महत्त्व वर्णून कथेची उत्थानिका सांगितली आहे. " दया धर्माचें मूल। आणि पाप पावकिं जल । फेडावया कर्ममल । दयापाणी ॥ ६१.१ "

याप्रमाणें सिद्धांत मांडून त्याला उदाहरण म्हणून हें यशोधराचें आख्यान दिलें आहे. भैरव नांवाच्या दांभिक गुरूच्या नादीं लागून मारिदत्त राजा चंडमारी देवीपुढें सर्व प्राण्यांच्या युगलांची हत्या करण्यास प्रवृत्त होतो. मनुष्य युगल म्हणून अभयरुचि व अभयमति अशा दीक्षित भावाबहिणीला शिपाई तेथें आणतात. त्यांचें तें सौंदर्य पाहून राजा त्यांना त्यांची माहिती विचारतो; व अभयरुचि ब्रह्मचारी आपल्या ८ व्या भवापासूनचा वृत्तांत सांगतो.

अधिकारु २ : जसोधर व चंद्रमतीचा मुलगा यशोधर व वीट देशाची राजकन्या अमृतादेवी यांचा विवाह झाला आणि त्यांना जसोमति हा मुलगाहि झाला. एके दिवशीं रात्रीं यशोधराला असें दिसलें कीं त्याची राणी अमृता ही त्याला झोप लागली असें समजून आपल्या कुबड्या प्रियकराकडे गेली. यशोधराला हा धक्का बसला पण त्यानें कोणाला सांगितलें नाहीं. त्याची आई चंद्रमती मुलाचा चेहरा उतरलेला पाहून कारण विचारते पण यशोधर रात्रीं एक भयानक स्वप्न पाहिल्याचें सांगतो. कुलदेवतेच्या शांतीसाठीं कोंबडा बळी दे म्हणून ती आग्रह करते पण यशोधर त्या हिंसेला तयार होत नाहीं. अत्याग्रहास्तव पिठाचा कोंबडा तो कापतो. पण तो कोंबडाहि कांपत असतांना ओरडतो. भयंकर पश्चात्ताप होऊन यशोधर दीक्षा घेण्यास निघतो पण अमृतादेवी त्याला व चंद्रमतीला आग्रहानें भोजनास बोलावून त्यांना विष घालते आणि जीव घेते.

अधिकारु ३ – यशोधर व चंद्रमति मरतात आणि हिंसाकर्मामुळें अनेक दुःखें भोगीत मोर–कुत्रा, सायाळ–सर्प, रोहित मासा–सुसर, शेळी–कोंकरू, रेडा इत्यादि जन्म घेत घेत कोंबडा–कोंबडी होतात. या सर्व जन्मांत प्रत्यक्ष मुलाशीं त्यांचा अनेकदां संबंध येतो. मुलगाच त्यांना कधीं कधीं मारतो. हें भववर्णन मोठें मार्मिक व रोचक आहे. शेवटीं एका मुनीच्या उपदेशानें त्या कुक्कुटांना जातिस्मरण होतें व ते धर्ममार्गाला लागतात. त्यानंतर आपल्याच मुलाच्या व सुनेच्या पोटीं जन्मून अभयरुचि व अभयमति असें नांव धारण करतात.

अधिकारु ४ : जसोमति ( यशोधराचा मुलगा ) शिकारीस जातो. मुनींना पाहून त्यांच्यावर कुत्रे सोडतो. शेवटीं कल्याणमित्र नांवाच्या शेटजीच्या सांगण्यावरून राजा जसोमति मुनीस शरण जातो. दीक्षा घेतो. अभयरुचि व अभयमति हीं भावंडेंहि दीक्षा घेतात.










अधिकारु ५ : दीक्षा घेऊन ब्रह्मचाऱ्यांच्या वेषांत राहणाऱ्या त्या भाऊबहिणीला मारिदत्त राजाचे शिपाई चंडमारीच्या देवळांत आणतात. येथें कथेचा धागा पुन: पहिल्या अधिकाराशीं जुळतो आणि पुढील कथा चालू होते. अभयरुचीचें हें चरित्र ऐकून मारिदत्त राजाहि अहिंसा धर्माचा अनुयायी होतो. सुदत्ताचार्याकडे जाऊन मारिदत्त आपलें पूर्वभव विचारतो व तें सर्व ऐकून शेवटीं दीक्षा घेतो.

याप्रमाणें हें यशोधराचें चरित्र अत्यंत मनोरंजक व बोधपूर्ण आहे.

## चरित्रांतील कांहीं उतारे :

### – भैरव जोग्याचें वर्णन

मग इतुकां जी अवसरीं । त्या नगराभीतरीं ।
आला डंबकारु । योगीया पैं ।। ८५ ।।
मस्तकीं जटा भरीतु । कानीं मुद्रा लोंबतु ।
गलां रुद्राक्ष लहकीतु । रुंडमाळा ।। ८६ ।।
रक्तवर्ण दीसेती बुबुल । हातीं धरीला त्रीसुल ।
मुख जैसा कालु । सारिखे देखा ।। ८७ ।।
कंटी बांधली योगटी । कासे कसीली लंगोटी ।
आंगी घेतली भस्मउटी । डंबिये देखा ।। ८९ ।।
म्हणे आयु बहुत मज । म्यां देखिलें रामाचें राज्य ।
सिता देविनें मज । मानिलें देखा ।। ९२ ।।
मज वाखाणीले रावणें । ब्रह्मा जाणें मजकारणें ।
महेश्वरू मज वाने । महंत म्हणौनि ।। ९३ ।।
द्वारकेचे जादव राणें । मानती मज कारणें ।
कौंतिचे पांचही जनें । मजसीं गोष्टी केल्या ।। ९४ ।।
यंत्र तंत्र मी जाणें । धातु फुरे मज कारणें ।
विद्या आकाश गामिनी । मी जाणुतु असे ।। ९५ ।।

अभयरुचि व अभयमति यांना पाहून मारिदत्त राजाला काय वाटलें ? –

हारे हे कोटिल मानुसें । तुम्हां हातिं पडलीं कैसे ।
याचे रूप तरी दिसे । अद्‌भुत देखा ।। १६८ ।।
धाकुटी रे दोघिजणें । पाहातां तरिरली या मणें ।
पारू नाहीं याच्या रूपा म्हणे । म्हणौनि राउ देखा ।। १६९ ।।
कीं हे इन्द्र आणि इंद्राणि । आणि नाग आणि नागिणी ।
किं विद्याधर दोघीजणी । तैसि दिसतीं ।। १७० ।।
यातें देखील्या उपरी । मज मोहो उपजे हो भारी ।
माझ्या पुत्र कन्येचीया परी । वाटत असे ।। १७१ ।।

### अमृतादेवीचें वर्णन

मागील वेला दीनकरू । उगवला पैं नीशा करु ।
परिवारें केला जोहारु । विसर्जली सभा ।। २६ ।।
मग राउ गेला झडकरि । जेथें अमृतेचि वोवरी ।
ते कैसी देखीली सुंदरी । सीणगारेसी पैं ।। २७ ।।
पाइआदु आगले । तेज करीति दशांगुलें ।
आंदु नेपुराचेनि खलालें । नादु उपजे ।। २८ ।।
नेसलीसे सुरंग सेला । वसुंधरेसे उरूलला ।
माजु असे सामावला । मुष्टीके देखा ।। २९ ।।
करी कांकने पैं लेइली । आंगी चोली असे मीरवली ।
कंटी हारेसी सोभीनली । गणीका जैसी देखा ।।३०।।
मुख सोभीत तांबोलें । कानीं झलकतीं कुंडलें ।
नाकीं सोभीत मुक्ताफलें । ढलढल करिती ।। ३१ ।।
डोलां रेखीले पैं काजल । हरिचंद्रे सोभीत नीडल ।
मस्तकीं तारिका झलाल । करितसे देखा ।। ३२ ।।
ऐसी सीनगारेसीं कामिनी । उभी ठेली कलसु घेउणी ।
रायाचें कटाक्ष बाणीं ।। मन वधिलें ।। ३३ ।।
गोष्टी करतां पैं लाजे । म्हणे धन्य जी विश्व माझें ।
येणें जाले राया तुझें । प्राणनाथा ।। ३५ ।।








जंव ऐसे बोले राणी । तंव रावो संतोषलां मनीं ।
घंटानादु आइकौणी । कुरंगु जैसा ॥ ३६ ॥

### यशोधराला कोंबड्याच्या जन्मांत धर्म ऐकावयाला मिळाला.

मग आम्हा जालें जातिस्मर। मग कांपीनले थरथर।
आठविले मागील भवांतर। जे दु:खे देखिलीं॥६२॥
आम्हा वधबंध आठवले। अनी मन गहीवरलें।
मग पीसारे उभे ठेले। पांख फडफड करिती ॥६३॥
आजीचा दीनु सोनियाचा। मुनीची आइकीली वाचा।
आजीं आम्हा पापाचा। अंतु आला ॥ ६४ ॥
आजीं तरलों पापसागरु। आजीं उतरलों दुखडोंगरु।
आजीं पावलों पा पारु। हा पशु जन्माचा ॥ ६५ ॥
आजीं पुण्याचें पडलें उघडेलें। या मुनीचें दर्शन जालें।
आजीं आमचें सफल जालें। कार्य देखा ॥ ६६ ॥
सूर्यमंडल उगवलें। कमलवन विकासेलें।
तैसें मन उल्हासलें। पक्षीयांचें देखा ॥ ६७ ॥
नाचती ते परस्परीं। अणी डुलती वरिच्यावरि।
वासु करिति सुस्वरीं। मधुर देखा ॥ ७० ॥

या प्राचीन मराठी काव्याची गोडी चाखावी तितकी कमीच आहे. अत्यंत नाट्यमय असें हें कथानक पं. मेघानें फारच सुरस रीत्या येथें वर्णिलें आहे. सामान्य जनतेच्या सर्व स्तरांतील जीवनांत प्रवेश करून जैनाचार्यांनीं व पंडितांनी जी ग्रंथ-निर्मिति केली आहे तिची अल्पशी ओळख या लेखद्वारें करून देण्याचा प्रयत्न केला आहे. महाराष्ट्र सारस्वतांत अजून या शाखेची पायाभरणी व्हावयाची आहे. मराठी रसिक व अभ्यासक यांचें लक्ष वेधावें यासाठींच हा प्रयत्न आहे.

---

## भारतीय संस्कृति

ह्या जगांत खऱ्या सुखाची प्राप्ति करून घ्यावी हें मनुष्याचें योग्य असें ऐहिक ध्येय आहे. आत्मा, मन व शरीर ह्यांचा स्वभावसुलभ सुसंवाद घडवून आणण्यांत व त्याचा परितोष करण्यांत या खऱ्या सुखाचें बीज आहे. ह्या सुसंवादित्वाची गुरुकिल्ली हस्तगत करून तदनुषंगानें आपल्या गतिविधींच्या द्वारें तें संवादित्व व्यक्त करणारी सुरचना कोणत्याहि संस्कृतीनें ज्यामानानें केली असेल त्यामानानेंच तिचें मूल्य ठरत असतें. त्याचप्रमाणें कोणत्याहि सुधारणेचीं ( Civilisation ) जीवनविषयक मूलभूत तत्त्वें, आचार-विचार, रीतिभाति हीं सर्व, हें सुसंवादित्व मूर्तिमान करण्याकरतां अशा प्रकारें कार्य करतात, त्याच्या लीलेमध्यें तालबद्धता कशी आणतात व तिच्या ध्येय-धोरणाची जोपासना व वाढ कशी साधतात यावरूनच कोणत्याहि सुधारणेचें गुणदोषमापन करावयाचें असतें. आतां, ह्या ध्येयाचें अनुसरण करणाऱ्या संस्कृतीचें स्वरूप आधुनिक युरोपीयन संस्कृतीप्रमाणें प्राधान्यत: भौतिक असेल वा ग्रीक-रोमन संस्कृतीप्रमाणें मानसिक व बौद्धिक असेल अथवा आजतागायत चालत आलेल्या भारतीय संस्कृतीप्रमाणें प्राधान्यत: आध्यात्मिक असेल. भारतीयांचा केंद्रभूत सिद्धांत हा आहे कीं अखिल सृष्टीमध्यें एक परम आत्मा, एक चिरंतन सत्य सर्वत्र वसत असून तें जड वस्तूंच्या पोटीं आच्छादिलें गेलें आहे व त्यामध्यें अपक्रांत झालेलें आहे.

—श्रीअरविंद
'भारतीय संस्कृतीचे मूलाधार' मधून










श्री. स. वा. कुलकर्णी

# ईश्वर आहे काय?

तर्कतीर्थ श्री. नारायणशास्त्री द्रविड यांचा वरील नांवाचा विद्वत्ताप्रचुर लेख नवभारताच्या मे ५७ च्या अंकांत प्रसिद्ध झाला आहे. लेखकाचा या विषयाचा अभ्यास किती विस्तृत आहे याची कल्पना लेख पूर्ण वाचल्याशिवाय येणार नाहीं. तथापि या १० पानी लेखाच्या अंतीं वरील प्रश्नाला लेखकानें कांहीं निश्चित उत्तर दिलें आहे किंवा काय हें पाहतां मात्र या दहा पानांचा मथितार्थ काय याचा प्रश्न पडतो.

### तर मग विवेचन कशाला ?

प्रारंभीं तर्कतीर्थ श्री. द्रविड यांनी नास्तिक वादाच्या प्रचलित विचारसरणींचा उल्लेख केला आहे. परंतु या सर्व विचारसरणींचा निकाल "पण ज्या अर्थी ईश्वर हा बुद्धिग्राह्य विषय नाहीं, त्या अर्थी त्या विषयी अनुकूल किंवा प्रतिकूल तर्क करीत बसणें वरील विवेचनाप्रमाणें अगदीं चूक असल्यामुळें ईश्वर नाहीं असें युक्तिवादाच्या आधारें सिद्ध करणाऱ्यांचा अभिनिवेश अनाठायी आहे असें दिसून येतें" या एका वाक्यानें लावला आहे. ईश्वर हा बुद्धिग्राह्य विषय नाहीं हें जर श्री. द्रविड मान्य करतात तर मग हें एवढें विवेचन कशाला असा प्रश्न मनांत उद्भवतो. ईश्वर हा श्रद्धेचा विषय आहे, आणि आमची ईश्वरावर श्रद्धा आहे असें म्हटलें असतें तर दोन ओळींत काम भागलें असतें. ज्यांना श्री. द्रविड "नास्तिक वादी" म्हणतात त्यांचें म्हणणें तरी हेंच आहे कीं, ईश्वर हा विषय बुद्धिग्राह्य नाहीं आणि म्हणून ईश्वर आहे हें म्हणणें बुद्धीला पटत नाहीं.

वर उद्धृत केलेलें वाक्यहि मासलेवाईक आहे. विवेचनाला प्रारंभ करतांना कोठेहि ईश्वर हा बुद्धिग्राह्य विषय नाहीं असें गृहीतकृत्य निर्दिष्ट नाहीं. ज्या "वरील विवेचना"चा उल्लेख आहे तें विवेचन कोणतें हेंहि स्पष्ट नाहीं. तसें कोणतें विवेचनहि नाहीं. अशा स्थितींत अनिर्दिष्ट गृहीतकृत्य व नसलेलें विवेचन यांच्या आधारावर बुद्धिवाद्यांना चूक ठरवून श्री. द्रविड मोकळे झाले आहेत.

### "नास्तिकवाद" नव्हे: आस्तिकवादावरील आक्षेप

वास्तविक सर्व विवेचनाची रचनाच मोठी उलटी झालेली आहे. नास्तिकवाद हा कांहीं स्वतंत्र वाद आहे अशा थाटांत त्या वादाचा उल्लेख करून त्याचें खंडन करण्याच्या तयारीत लेखाचा प्रारंभ झाला आहे. (पुढें खंडन करण्याचा विचार बाजूला ठेवून 'हा बुद्धिग्राह्य विषय नाहीं' असें सांगून श्री. द्रविड मोकळे झाले आहेत.) प्रारंभींच्या "स्वतःच्या अभ्यासपूर्वक हस्तगत केलेल्या नास्तिकतेचे युक्तिवादावर आधारलेलें समर्थन मिळविल्याचा आनंद होतो" या वाक्यावरूनहि तर्कतीर्थांचा हा दृष्टिकोन स्पष्ट होतो. हा दृष्टिकोन चुकीचा आहे. नास्तिकवाद हा स्वतंत्र वाद नसून तो केवळ आस्तिकवादावरचा आक्षेप आहे. ईश्वर म्हणजे काय याचें स्पष्टीकरण श्री. द्रविड यांनीं केलें नाहीं. पण त्या शब्दाचा सर्वसाधारण अर्थ घेतल्यास, ईश्वराचा प्रत्यक्ष अनुभव आमच्या इन्द्रियांना होत नाहीं. अनुमानामुळेंहि ईश्वराच्या अस्तित्वावर विश्वास ठेवण्याची आवश्यकता भासत नाहीं. अशा वेळीं जर एखादा मनुष्य ईश्वर आहे म्हणून सांगू लागला तर तो आहे असें कां मानावयाचें याचीं कारणें देण्याची जबाबदारी त्याच्यावर आहे. त्यानें दिलेलीं










कारणें बरोबर आहेत कीं नाहींत याचा विचार केल्याशिवाय त्याच्या शब्दावर विश्वास ठेवतां येणार नाहीं. त्यानें दिलेलीं कारणें आम्हास पटलीं नाहींत तर ती कां पटलीं नाहींत हें सांगणें म्हणजे नवा 'नास्तिकवाद' निर्माण करणें नव्हे. नास्तिकवादी विचारसरणीचा सारांश म्हणून ज्या तीन विचार-सरणींचा उल्लेख श्री. द्रविड यांनीं केला आहे किंवा कांटच्या ज्या तीन विचारसरणींचा उल्लेख केला आहे ( दोन्ही बहुतांशीं एकच आहेत ) त्या विचारसरणी पाहतां हें स्पष्ट होईल कीं हे स्वतंत्र विचार नसून आस्तिकवादी ईश्वरश्रद्धेला जीं कारणें देतात त्यांवरील आक्षेप आहेत. "नास्तिवादी" इतकेंच म्हणतो कीं, 'तुम्ही ईश्वराचें अस्तित्व मानण्याला जीं कारणें देता त्यावर आमचे हे आक्षेप आहेत. व म्हणून तीं आम्हास पटत नाहींत. आमचे आक्षेप चुकीचे असल्यास तसें दाखवा किंवा दुसरीं कांहीं पटण्यासारखीं कारणें असल्यास तीं दाखवा ! याला जर श्री. द्रविडांचें उत्तर ईश्वर हा केवळ श्रद्धेचा विषय आहे एवढेंच असेल तर प्रश्नच शिल्लक रहात नाहीं. ज्यांना श्रद्धा ठेवावीशी वाटेल त्यांनीं ठेवावी. पण ज्यांना श्रद्धा ठेवण्यास पुरेसें कारण दिसत नाहीं अशांना या अश्रद्धेबद्दल कमी लेखण्याचें कारण काय ?

## ईश्वर म्हणजे काय ?

श्री. द्रविड यांच्या लेखाचा परामर्श घेणें एका कारणास्तव फार कठीण झालें आहे. कारण, नास्तिक-वाद्यांची टर उडवून, ईश्वर आहे असें जरी त्यांनीं ठासून सांगितलें असलें तरी हा ईश्वर म्हणजे काय याचें मात्र स्पष्टीकरण त्यांनीं केलें नाहीं. ईश्वर या कल्पनेची व्याख्या, निदान स्पष्टीकरण तरी आव-श्यक होतें. यावर श्री. द्रविड कदाचित् असें उत्तर देतील कीं, 'ईश्वराची' व्याख्या द्यावयाची तर ती बुद्धिगम्य कल्पनांच्याच आधारें द्यावी लागेल, आणि ईश्वर तर बुद्धीच्या आकलनाच्या पलीकडचा आहे; तो केवळ श्रद्धा व अनुभव ( बुद्धीचें तेथें काम नाहीं ) यानें समजतो. असें जर असेल तर बुद्धिगम्य विश्वाच्या पलीकडे "कांहीं" तरी आहे अशी श्रद्धा असणें इतकाच याचा अर्थ होतो. आणि असा जर कोणी ईश्वर असेल तर त्याचा आणि मनुष्याचा संबंध येणें शक्य नाहीं. कारण इंद्रियें आणि बुद्धि हेच मनुष्याशी संबंध येण्याचे मार्ग आहेत. मग असा ईश्वर असणें आणि नसणें या दोन्हीहि गोष्टी मनुष्याच्या दृष्टीनें सारख्याच अर्थशून्य आहेत.

ईश्वराचें ज्ञान होण्याचा मार्ग श्री. द्रवीड पुढील प्रमाणें वर्णितात—

"विचारक स्वतः जिज्ञासू वृत्तीनें **स्वानुभवा-च्या** द्वारें ( **तर्कानें** नव्हे ) सत्यान्वेषणाच्या मार्गास लागला तरच त्याला खरें ज्ञान मिळण्याची शक्यता आहे. या मार्गांत **बुद्धीची** मदत तर होणार नाहींच, उलट बुद्धीमुळें अडथळे मात्र उत्पन्न होतील."

तात्पर्य श्रद्धा ( –जिचा उल्लेख अन्यत्र आहे ) व स्वानुभव हेच ईश्वराचें ज्ञान करवतील, तर्क व बुद्धि या ज्ञानाला अडथळा उत्पन्न करतील. या विधानावरून तर्कतीर्थांच्या मनांत श्रद्धा, अनुभव, बुद्धि व तर्क या चार शब्दांमागील कल्पनांविषयीं बराच गोंधळ आहे असें दिसतें. शिवाय मनुष्यानें जिज्ञासू तर असावयाचें पण तर्क व बुद्धीला संपूर्ण फाटा द्यावयाचा अशी एक अगम्य अवस्थाहि त्यानीं कल्पिली आहे.

## बुद्धीचें कार्य

बुद्धि या शब्दानें तर्कतीर्थांना काय अभिप्रेत आहे तें त्यांनीं स्पष्ट केलें नाहीं. मनुष्याला पंचें-द्रियांच्या माध्यमानें विविध अनुभव मिळत असतात. तसेंच ते सर्व अनुभव इतर प्राण्यानांहि येत असतात. काचेंतून आकाश दिसतें म्हणून








चिमणी बाहेर जाण्याकरितां तिच्यावर सारखी धडक मारीत असते. स्पर्शज्ञानामुळें अडथळयाचा अनुभव तिला होतो. मनुष्यालाहि तो अनुभव होतो. हाच अनुभव दोन-तीनदां आला तर मनुष्य आपला असा विश्वास तयार करतो कीं काचेंतून आकाश दिसत असलें तरी काचेंतून आकाशांप्रत जातां येत नाहीं. मग बाहेर जाण्याकरितां मनुष्य अन्यमार्ग शोधतो, चिमणी मात्र काचेवर धडका देतच राहते. कांहीं विशिष्ट अनुभवांवरून कांहीं आडाखे बांधण्याची ही जी शक्ति आहे तिला आपण बुद्धि म्हणतो. अनुभवावरून बुद्धीच्या साहाय्यानें विश्वास ( श्रद्धा ) निर्माण होतो. बुद्धि बाजूला ठेवल्यास उदाहरणांतील चिमणीप्रमाणें केवळ अनुभवांचें गाठोडें जमेल पण तें गाठोडें केवळ असून नसल्यासारखेंच होईल; कारण मागील अनुभव कसाहि असला तरी पुढील कृति पहिल्याप्रमाणेंच व्हावयाची. तात्पर्य, बुद्धि बाजूला ठेवल्यास एखाद्या चिमणींत ( चिमणीलाहि थोडी बुद्धि असते, पण आपण समजूं कीं ती पूर्ण निर्बुद्ध आहे ) व मनुष्यांत कांहींहि फरक नाहीं. चिमणीलाहि सर्व पंचेंद्रियांचे अनुभव आहेत, व काचेंतून आकाशाप्रत जाऊं अशी श्रद्धाहि आहे !

आलेल्या अनुभवावरून कांहीं विश्वास तयार करणें ( ज्याला निष्कर्ष काढणें असें म्हणतां येईल ) हें जसें बुद्धीचें काम आहे तसेंच नवीन अनुभव जुन्या अनुभवाशीं पडताळून पाहणें हेंहि बुद्धीचें काम आहे. मी नेहमी पहात असलेल्या एका विशिष्ट प्रकारच्या प्राण्याला ( घोड्याला ) एकच डोकें असलेलें नेहमी दिसून येतें. म्हणून मी असा विश्वास राखतो ( निष्कर्ष काढतो ) कीं घोडयाला एकच डोकें असतें. पण समजा कि एका दिवशीं घोडयाला दोन डोकीं असलेलीं मला दिसूं लागलीं अशा नवनव्या अनुभवांची जुन्या विविध अनुभवांशीं सांगड घालण्याची ही एक जन्मजात प्रवृत्ति व शक्ति मनुष्यामध्यें आहे. या शक्तीलाहि आपण बुद्धि म्हणतों. दोन डोक्याचा घोडा पाहून माझ्या मनांत अनेक पर्याय उद्‌भवणें संभवनीय आहे. उदाहरणार्थ:– ( १ ) क्वचित् दोन डोक्याचा घोडा असूं शकतो, ( २ ) मला भोंवळ आल्यामुळें एकाचीं दोन डोकीं दिसलीं असतील, भोंवळ आल्यावेळीं एकाच्या दोन वस्तू दिसण्याचा पूर्वीचा अनुभव आहे; ( ३ ) कोणी चेटूक करून एक डोक्याच्या घोडयाला दोन डोकीं केलीं असतील; (४) माझ्या डोळयांत कांहीं बदल घडून आला असेल कीं ज्यामुळें एकाचे ठिकाणी दोन डोकीं दिसूं लागलीं, इत्यादि इत्यादि. या सर्व पर्यायांतून कोणता पर्याय माझ्या पूर्वीच्या अनुभवाशीं अधिकांत अधिक सुसंगत आहे हें बुद्धि ठरविते व सर्वांत सुसंगत पर्यायाचा स्वीकार करते. ( क्वचित् कोणताच पर्याय पूर्वानुभवांशीं सुसंगत नसेल तर या अनुभवाचा अर्थ लागत नाहीं म्हणून बुद्धि थांबते ).

तात्पर्य, अनुभवांची संगति लावून त्यांवरून निष्कर्ष काढणें ( म्हणजे ज्ञान मिळविणें ) हें काम करणारी प्राण्याच्या अंगभूत असलेली अशी जी शक्ति ती बुद्धि होय. तर्कतीर्थ ईश्वराच्या ज्ञानाला स्वानुभवाची आवश्यकता सांगतात, पण बुद्धीचा अडथळा नको म्हणतात. मग त्या अनुभवांचा उपयोग काय ? डोळयासमोर काजवे चमकले हा अनुभव. तो ईश्वराचा आविष्कार कीं ठेच लागल्याचा परिणाम ? बुद्धि सांगते ठेच लागल्यामुळें काजवे चमकले, पण बुद्धीला हद्दपार केल्यास ईश्वराचा आविष्कारच शिल्लक राहतो !

तर्काची हकीकतहि तीच आहे. तर्क ही केवळ बुद्धि वापरण्याची पद्धत आहे.

एकंदरीत पाहतां तर्कतीर्थांच्या म्हणण्याचा आशय असा कीं ईश्वर ही बुद्धिग्राह्य वस्तु नसल्यानें ईश्वराच्या अस्तित्वावर श्रद्धाच ठेवली पाहिजे व










अनुभव घेत राहिलें पाहिजे. पण अनुभवांची छाननी मात्र करतां कामा नये कारण बुद्धीचें येथें काम नाहीं. ' मग अनुभवाचें तरी काम काय ' असा प्रश्न विचारल्यास त्याला तर्कतीर्थांना उत्तरहि देतां येणार नाहीं; कारण अनुभवावरून कांहीं ज्ञान करून घ्यावयाचें असेल तर तेथें बुद्धि आलीच. ' ईश्वर आहे काय ? ' असा प्रश्न उपस्थित करून व दहा पानें खर्ची घालून शेवटीं प्रश्नाचें उत्तर एवढेंच कि ' बाबारे, तशी श्रद्धा ठेव ' !

## आक्षेपांना उत्तर नाहीं

यापमाणें आपला आस्तिकवाद मात्र टीकेच्या कक्षेच्या बाहेर ठेवून, आक्षेपकांवर मात्र श्री. द्रविड यानीं भरपूर टीका केली आहे. पूर्वींच्या आक्षेपकांचा विचार अधिक मूलगामी होता असें सांगून आजच्या आक्षेपकांची अवहेलना केली आहे. प्रश्न आजचे आक्षेपक शाहणे कीं पूर्वींचे हा नसून आक्षेपांनां उत्तर काय हा आहे. जातां जातां तर्कशास्त्रावरहि बरेच कोरडे ओढले आहेत. गणित, Physics, Psychology, Philosophy वगैरेंचेहि विषयानुषंगानें उल्लेख आले आहेत, यांतील पुष्कळसे उल्लेख मुख्य प्रश्नाशी संबंधित नसल्यानें त्यांचा साकल्यानें परामर्श घेण्याचें कारण नाहीं. पण कांहीं महत्त्वाच्या विधानांची चर्चा करणें आवश्यक आहे; कारण या निरनिराळया शास्त्रांचे उल्लेख देऊन आपल्या म्हणण्याला पुष्टी येत असल्याचा आभास तर्कतीर्थांनीं निर्माण केला आहे आणि तो आभास दूर करणें आवश्यक आहे. शिवाय बरेचसें विवेचन चुकीच्या कल्पनांवर आधारलेलें आहे.

## तर्कावर अकारण राग

तर्कावरील आक्षेप असा कीं तर्कशास्त्रीय प्रक्रिया कृत्रिम असून ती बौद्धिक मनोरंजनाचें एक साधन मात्र आहे; तर्कावर कांहींच सिद्ध होत नाहीं कारण तर्काला प्रतितर्क देतां येतो, आपल्याला पूर्णपणें न पटलेली पण पटल्यासारखी वाटणारी गोष्ट इतरांच्या गळीं उतरविण्याचें साधन म्हणजे तर्कशास्त्र इत्यादि. अव्याघाताचा नियम ( Law of non-contradiction ) हा खरा आहे कीं नाहीं हा प्रश्नच भिन्न आहे त्या नियमाला धरूनच बुद्धी काम करूं शकते. त्या नियमावाचून बुद्धि काम करूंच शकणार नाहीं व मनुष्य आणि निर्बुद्ध प्राणि यांचे मध्यें कांहींच फरक राहणार नाहीं. जर असें होईल कीं माझ्या हातांतील भांड्यांत पाणी आहेहि आणि नाहींहि, तर मग मी पाणी प्यावें किं पाण्यासाठीं दुसरीकडे शोध करावा ? पाणी आहे ही तरी एक गोष्ट निश्चित आहे किंवा पाणी नाहीं ही तरी. दोन्ही गोष्टी एकाच वेळी संभवणें बुद्धीच्या आकलना बाहेर आहे आणि बुद्धीच्या आकलनाच्या बाहेरच्या गोष्टीशीं आपलें कांहीं काम असूं शकत नाहीं. कारण अनुभवांच्या आकलनाला बुद्धीवाचून दुसरी शक्ति मनुष्याजवळ नाहीं- म्हणून बुद्धीला काम करावयाचें असेल तर याच नियमावर चाललें पाहिजे. याच नियमावर (Syllogism) निगमन आधारलें आहे. निगमनावरून नवीन कांहीं ज्ञान होतें असें कोणाचेंच म्हणणें आज नाहीं. सर्व माणसें मर्त्य असतात असें एक गृहीत धरल्यास, सॉक्रेटीसला जर माणूस म्हणावयाचें तर तो मर्त्य आहे कीं नाहीं हें प्रथम पाहिलें पाहिजे. तो मर्त्य नसेल तर माणूसच ठरणार नाहीं. त्यामुळें तो मर्त्य आहे हें कांहीं नवीन ज्ञान नाहीं. परंतु निगमनावरून आपणांस एवढें दिसूं शकतें कीं जर आपण असें गृहीत धरलें कीं ( १ ) सर्व माणसें मर्त्य आहेत व ( २ ) सॉक्रेटीस हा माणूस आहे तर मग आपण असें कधींहि म्हणतां कामा नये कीं जेणेंकरून सॉक्रेटीस हा मर्त्य आहे या विधानाला बाधा येईल. निगमन ही एक आपले विचार सुसंगत आहेत किंवा नाहींत हें पारखण्याची पद्धति आहे, व निरनिराळया निष्क-








र्यांतील तफावत स्पष्ट करण्याचा तो मार्ग आहे. यांत न पटलेल्या गोष्टी दुसऱ्याच्या गळीं उतरविण्याचा प्रश्नच येत नाहीं. एकदां कांहीं गृहीतें मान्य केल्यानंतर त्याच्या अंगभूत कोणत्या गोष्टी आहेत तें निगमनानें दाखवितां येतें; पण तीं गृहीतें मान्य करणें न करणें हें ज्याच्या त्याच्या इच्छेवर अवलंबून आहे. गृहीतकृत्यें निश्चित केल्यानंतर तर्काला प्रतितर्क देतां येतो तो नवीन गृहीतकृत्यें घुसडून. हीं नवीन गृहीतकृत्यें स्वीकारावींत कीं नाहीं हा ज्याचा त्याचा प्रश्न आहे. परंतु निगमनाचें मर्यादित स्वरूप लक्षांत न घेतां श्री. द्रविड यांनीं निष्कारण तर्कावर आग पाखडली आहे.

## विज्ञानाच्या नियमांचें स्वरूप

नवीन ज्ञान मिळविण्याचा मार्ग हा अनुभवावरून निष्कर्ष काढणें हा आहे ( induction ). भौतिक शास्त्रें हाच मार्ग अनुसरतात. आंब्याचा देठ तुटला कीं आंबा झाडावरून जमिनीवर पडतो हा आजपर्यंतचा अनुभव आहे. प्रत्येक वेळीं आंबा खालींच पडला आहे. एकदाहि तो खाली पडण्याऐवजीं वर जाऊं लागलेला दिसला नाहीं. म्हणून विज्ञान, देठ तुटल्यास आंबा जमिनीवर पडतो असा नियम बांधतें. पण हा नियम त्रिकालाबाधित नाहीं याची जाणीव विज्ञानाला आहे. न जाणो उद्यां देठ तुटल्यावर आंबा वर जाऊं लागेल. पण आजपर्यंत देठ तुटल्यावर सर्व आंबे खालींच पडत राहिल्यामुळें क्ष हा आंबाहि देठ तुटल्यावर खालीच पडण्याची शक्यता इतकी मोठी आहे कीं वरील नियम खरा धरून चालायला तूर्त तरी हरकत नाहीं. विज्ञानाचे सर्व नियम अशाच स्वरूपाचे आहेत. गुरुत्वाकर्षणाचा नियम खरा धरल्यास ग्रहांच्या गतीशीं तो मिळतो म्हणून तो खरा धरून चालावयाचें. पण Mercury च्या गतींतील फरक गुरुत्वाकर्षणाच्या नियमांत बसत नाहीं; तो आईनस्टाईनच्या नियमांत बसतो म्हणून आईनस्टाईनचे नियम अधिक बरोबर मानावयाचे. निरीक्षिलेल्या अनुभवांची सांगड लावूं शकतील असे निष्कर्ष हे विज्ञानाचे नियम. ते खरे आहेत कीं नाहींत हा प्रश्नच उद्भवत नाहीं. जोपर्यंत नवनव्या अनुभवाशीं ते सुसंगत आहेत तोपर्यंत खरे; विसंगत ठरले तर नव्या व जुन्या सर्व अनुभवांची संगति लावूं शकणारे नवे नियम शोधावे लागतील. शिवाय, न्यूटनचा गुरुत्वाकर्षणाचा नियम व आईनस्टाईनचा नियम हे दोन्ही निगमनात्मक आहेत हें म्हणणेंहि बरोबर नाहीं. दोघांनींहि आपले नियम प्रायोगिक अनुभवांवर ( म्हणजे आगम पद्धतीनें ) बसविले आहेत. श्री. द्रविड म्हणतात:–

" समजा एका शास्त्रज्ञानें सिद्ध करून दाखविलें कीं अमुक अमुक कारणास्तव इलेक्ट्रॉनचें अस्तित्व मान्य केलें पाहिजे. हें म्हणणें कितीहि तर्कशुद्ध असलें तरी दुसऱ्या एका शास्त्रज्ञानें पहिल्या शास्त्रज्ञाविरुद्ध असें जर सिद्ध करून दाखविलें कीं इलेक्ट्रॉनचें अस्तित्व अमान्य करूनहि दिलेल्या कारणांची उपपत्ति लावतां येणें शक्य आहे तर दोघांचे युक्तिवाद निःपक्ष बुद्धीनें समजून घेण्याचा प्रयत्न करणाऱ्या एका सामान्य विचारकास कोणाचें म्हणणें खरें आहे तें ठरविणें कठीण आहे. "

विज्ञानाच्या पुरेशा ज्ञानाच्या अभावांमुळेंच श्री. द्रविडांनीं असें विधान केलेलें दिसतें. इलेक्ट्रॉनचें अस्तित्व न मानतां जर सर्व कारणांची उपपत्ति लावतां आली तर कोणताहि शास्त्रज्ञ निष्कारण इलेक्ट्रॉनचें अस्तित्व मानण्याच्या भानगडींत पडणार नाहीं !

## गणितशास्त्राबद्दल गैरसमज

गणितशास्त्राबद्दल श्री. द्रविड यांनीं " गणिताच्या पूर्ण सत्यत्वाबद्दलचा शास्त्रज्ञांचा परंपरागत अभिनिवेश निराधार आहे " असें म्हटलें आहे. वाक्याची रचना अधिक स्पष्ट असती तर बरें झालें










असतें. नेमकी कोणती कल्पना चूक आहे असे श्री. द्रविड यांना म्हणावयाचें आहे हें स्पष्ट होत नाहीं. पण या वरून श्री. द्रविड असें सुचवितांना दिसतात कीं गणित शास्त्रहि चुकतें. गणित शास्त्र कांहीं गृहीतकृत्यें धरून त्यावरून कोणते निष्कर्ष निघतात तें पाहतें. गृहीतकृत्यें बरोबर आहेत कीं नाहींत किंवा निष्कर्ष प्रत्यक्ष सृष्टीला लागू पडतात कीं नाहींत हा गणितशास्त्राचा विषय नाहीं. अमुक गृहीतकृत्यावरून अमुक निष्कर्ष निघतात हें सांगणें एवढेंच गणिताचें काम आहे. या कामांत गणित शास्त्र चुकलें तरच तें चूक म्हणतां येईल. अशा चुका श्री. द्रविड यांनीं दाखविल्या नाहींत. मग गणिताबद्दल त्यांचा अनादर कां ते समजत नाहीं. "Mathematics is the science in which we do not know what we are talking about, and do not care whether what we say about it is true." अशी गणिताची व्याख्या रसेल ह्यानीं केली आहे.

### ईश्वराचें अस्तित्व सिद्ध करण्याची जबाबदारी

श्री. द्रविडानी आक्षेपकांच्या माथीं "स्वार्थ–बुद्धिवाद" हि ठेवला आहे. हेंच शस्त्र दिशा फिरवून आस्तिकवाद्यांवर उगारतां येईल. त्यानां तर तें अधिक बोचणारें आहे; कारण ईश्वराचें अस्तित्व सिद्ध करावयाचें असेल – ( श्री. द्रविड हे ईश्वर बुद्धिग्राह्य नाहीं असें म्हणून त्या मार्गांतच पडत नाहींत ! ) तर तो बोजा ( burden of proof ) आस्तिकवाद्यांवरच आहे.

---

## अंत्यजांची सुधारणा

आर्यांच्या ग्रामसंस्थांत कायमचें स्थान मिळाल्यापासून, अंत्यजांची सुधारणा नाना प्रकारानें झालेली आहे. ( १ ) त्यांचा वन्यपणा सुटून, त्यांना ग्राम्यपणा आला. ( २ ) केवळ पारधीनें उपजीविका करण्याचें सुटून, गांवांत शेती व इतर धंदे करून ते उपजीविका करूं लागले. ( ३ ) नग्नावस्था जाऊन, वस्त्राच्छादनावस्था त्यांना प्राप्त झाली. ( ४ ) मद्यपाना पासून परावृत्ति झाली. ( ५ ) जिवंत गाईचें मांस खाण्याचें बंद पडलें. ( ६ ) त्यांच्या मूळच्या निकृष्ट भाषांहून श्रेष्ठ ज्या प्राकृत भाषा त्यांच्या द्वारें ते विचारप्रदर्शन करूं लागले. ( ७ ) चोरटेपणा जाऊन संभावितपणा आला. ( ८ ) ब्राह्मणांकडून उपाध्येपण करून घेण्याची सवड मिळाली. ( ९ ) वन्यदेवताराधनाच्या ऐवजीं रामकृष्णादि आर्यदेवतांचें उपासकत्व लाभलें. ( १० ) अशी आर्यसंस्कृतींत प्रतिष्ठापना होतां होतां, भक्तिमार्गाच्या सोपानानें कित्येक अंत्यजांना सर्ववर्णवंद्य असें संतपण गांठतां आलें. जातिसंस्थेच्या जादूनें अनार्योत्पन्न अंत्यजांची ही अशी सुधारणा झाली.

– इतिहास संशोधक वि. का. राजवाडे.

( हिंदूसमाजांत हिंद्वितरांचा समावेश. )



अनुक्रमणिका








प्रा. प्र. चिं. शेजवलकर

# योजनेंतील एक यक्षप्रश्न-भारताचा निर्यात व्यापार

भारताच्या विद्यमान आर्थिक नियोजनाची मीमांसा करतांना टीकाकार जो एक महत्त्वाचा दोष दाखवितात तो म्हणजे सरकारनें उत्पादनासंबंधीं जसे प्रगतीचे नियोजित टप्पे ठरविले आहेत त्याप्रमाणेंच विविध वस्तूंच्या निर्यात व्यापारांत आणि निर्यात व्यापारामुळें मिळणाऱ्या परदेशी हुंडणावळींत ठराविक प्रगति साध्य करण्याचा विशिष्ट टप्पा ठरविलेला नाहीं. पंचवार्षिक योजना कार्यवाहींत आणण्याकरितां लागणारा आवश्यक निधि कसा उभा करावा हा सरकारापुढें प्रश्न आहे. अशा वेळीं परदेशी हुंडणावळ मोठ्या प्रमाणावर उपलब्ध करून देणाऱ्या निर्यात व्यापाराकडे पहिल्या पंचवार्षिक योजनेपेक्षां जास्त लक्ष द्यावयास हवें होतें. द्वितीय पंचवार्षिक योजनेंत अवजड स्वरूपाचे मोठाले उद्योग-धंदे स्थापन करण्याचा सरकारचा मानस असल्यामुळें त्याकरितां लागणारी यंत्रसामग्री व इतर आवश्यक माल आयात करण्यासाठीं दरवर्षी सरासरीनें ८६८ कोटि रुपये एकंदर आयातीवर खर्च होत जाणार असें सरकारनें गृहीत धरलें असून निर्यात मात्र त्या मानानें खूपच कमी होण्याची शक्यता आहे असें सरकारी आंकडेवारीवरूनच दिसून येत आहे. १९५५ मध्यें सरासरी निर्यात ५९६ कोटि रुपयांची झाली व १९५६ मध्येंहि यापेक्षां जास्त झाली नसावी असा अंदाज काढण्यांत आला आहे. द्वितीय पंचवार्षिक योजनेसाठीं लागणाऱ्या उत्पन्नाचे मार्ग शोधतांना जनतेवर करांचा बोजा वाढविण्याचें हुकमी हत्यार वापरतेवेळीं अपेक्षित उत्पन्नांतील उणीवा भरून काढण्यासाठीं सरकारनें निर्यातवृद्धीचा सुसंघटित प्रयत्न करणें आवश्यक आहे. सुदैवानें सरकारनें याबाबतींत अलीकडे जागरूकता दाखविण्यांस सुरुवात केली आहे ही अभिनंदनीय गोष्ट आहे.

### निर्यात अभिवृद्धि समित्या

ज्या वस्तूंना परदेशी बाजारपेठा सहज मिळवितां येण्याची शक्यता आहे अशा वस्तूंच्या निर्यातवाढीसाठीं गेल्या दोन वर्षांत सरकारनें निर्यात अभिवृद्धि समित्या ( Export Promotion Councils ) स्थापन करण्यांस सुरुवात केली आहे. उदाहरणार्थ, सुती कापड, प्लास्टिक, तंबाखू, रेशीम आणि रेयॉन, काजू, अभ्रक, दालचिनी आणि चामड्याच्या वस्तू या पदार्थांच्या निर्यातीत कारखानदारांना व व्यापाऱ्यांना वाढ करतां येण्यासाठीं त्या त्या वस्तूसाठीं एकएक स्वतंत्र निर्यात अभिवृद्धि समिति स्थापन झालेली आहे. या समित्या दोन महत्त्वाचीं कामें पहातात. त्यांतील पहिलें काम म्हणजे परदेशी बाजारपेठांची पाहणी करून त्या मिळविण्याचा प्रयत्न करणें हें होय. त्याकरितां विविध देशांत सरकारतर्फे शिष्टमंडळें पाठविलीं जातात आणि परदेशांशीं व्यापारी करार घडवून आणण्यांस सरकारला साहाय्य होतें. आतापर्यंत अशा तऱ्हेनें भारतसरकारनें चौदा लहानमोठ्या देशांशीं व्यापारी करार करून निर्यात वाढविण्याची व्यापाऱ्यांना हमी मिळवून दिली आहे. परदेशी बाजारपेठा काबीज करण्यासाठीं आपल्या देशांतील मालाचा प्रचारहि अधिक आणि चांगल्या तऱ्हेनें व्हावयास हवा. ज्या देशांत शिष्टमंडळें पाठविणें अशक्य असतें तेथें त्या त्या देशांतील आपले व्यापारी–प्रतिनिधि स्वतः किंवा पत्रव्यवहार करून आपल्या देशांतील मालाचा प्रचार करण्यास हातभार लावतात. विविध देशांत वेळोवेळीं भरणाऱ्या औद्योगिक व व्यापारी प्रदर्शनांत भाग घेऊन किंवा स्वतंत्ररित्या प्रसिद्धी करूनहि आपला माल परदेशांत खपविण्यास सरकार मदत करतें. उदाहरणार्थ आतांपर्यंत, जगांतील विविध देशांत भरलेल्या एकूण अकरा प्रदर्शनांत भाग घेण्यास सरकारनें उद्योगपतींना साहाय्य केलें आहे. परदेशांत नियुक्त



अनुक्रमणिका






केलेल्या भारतसरकारच्या ट्रेड-कमिशनरांच्या कामाचें क्षेत्र मुद्दाम अलीकडे वाढविण्यांत आलें आहे आणि सरकारनें परदेशांत स्थापन केलेल्या प्रसिद्धी-संघटनांच्या स्वरूपांत पुष्कळ सुधारणा केल्या आहेत.

केवळ परदेशांतील बाजारपेठांची पहाणी करणें येवढेंच निर्यात-अभिवृद्धि-समितीचें काम नसतें. ज्या पदार्थांची निर्यात वाढवावयाची त्या पदार्थांच्या उत्पादनाचा दर्जा वाढविणें आणि निर्यात–व्यापाऱ्यांच्या तक्रारी आणि अडचणी सोडवून त्यांना योग्य तें मार्गदर्शन करणें हें दुसरें महत्त्वाचें काम या समित्यांना पहावें लागतें. प्रामाणिकपणाची कांस धरून चांगल्या दर्जाचा माल पाठविण्याची आवश्यकता धंदेवाईकांना पटवून देणें, ज्या दर्जाचा माल मागविला जातो त्या दर्जाचा माल तयार होत आहे कीं नाहीं यावर नजर ठेवणें, परदेशांतल्या व्यापाऱ्यांच्या आपल्या मालाबद्दल किंवा निर्यात करणाऱ्यांबद्दल कांहीं तक्रारी आल्यास त्यांची शहानिशा करून आपल्या व्यापाऱ्यांच्या चुका दुरुस्त करण्यास त्यांना भाग पाडणें, कोणत्या देशांत कोणत्या पदार्थांना जास्त मागणी येण्याची शक्यता आहे याची आंकडेवारी येथील निर्यात व्यापाऱ्यांना उपलब्ध करून देणें अशीं अनेक प्रकारचीं देशांतर्गत कामें मघाशीं ज्याचा उल्लेख केला त्या त्या वस्तूंच्या निर्यात-अभिवृद्धि-समित्यांना करावीं लागतात.

## समित्यांनीं केलेली कामगिरी

वरीलपैकीं बऱ्याच समित्यांनीं निर्यात व्यापार वाढविण्याचे दृष्टीनें बरीच कामगिरी केली आहे. कापडनिर्यात-अभिवृद्धि-समितीनें ब्रह्मदेशांत कापडाची निर्यात करण्याचा भारत सरकारनें केलेला करार अमलांत आणण्यास मदत केली. परदेशांतील व्यापाऱ्यांशी विक्रीचे करार करून देण्यास साहाय्य केलें. निर्यात करावयाच्या कापडाचा दर्जा योग्य आहे किंवा नाहीं हें तपासण्याचें काम शक्य होण्यासाठीं मुंबईतील ५० व अहमदाबादेंतील १६ कापड-गिरण्यांचें सहकार्य मिळविलें. रेयॉन व रेशीम यांच्यासाठीं नेमलेल्या निर्यात–अभिवृद्धि-समितीनें या पदार्थांची निर्यात अफगाणिस्तान, सुदान, कुवेट आणि एडन या बाजारपेठांत घटली होती त्याचीं कारणें शोधून काढलीं आणि जकात अधिकाऱ्यांना योग्य तें मार्गदर्शन केलें. दालचिनी आणि काजू या पदार्थांसाठीं स्थापन झालेल्या समित्यांनीं शास्त्रज्ञ नेमून कारखान्यांतील उत्पादनाची पहाणी केली आणि मालाचा दर्जा सुधरविण्यास हातभार लाविला. मध्य आणि पूर्व युरोपियन देशांत शिष्टमंडळें पाठविलीं. तंबाखूसाठीं स्थापन केलेल्या निर्यात–अभिवृद्धि-समितीनें आशिया आणि आफ्रिका या खंडांतील बाजारपेठांचीं शिष्टमंडळें पाठवून पहाणी केली आणि सुदान, झांझिबार, एडन इत्यादि बाजारपेठांत तंबाखूच्या विडयांनाहि खूप मागणी येऊं शकेल असें दाखवून दिलें.

## निर्यात होऊं शकणारे पदार्थ

कापूस, सुती कापड, चहा, तयार ज्यूट, लोखंड, तंबाखू, चामडयाचे पदार्थ आणि मँगेनीझ या पदार्थांची निर्यात आपल्या देशांतून मोठ्या प्रमाणावर होते. परंतु यांनीं काबीज केलेल्या बाजारपेठा टिकविणें हें देखील एक अत्यावश्यक काम होऊन बसलें आहे. युरोपांतील बऱ्याच देशांनीं काटकसरीसाठीं चहाची मागणी कमी करण्यांत यश मिळविलें आहे. पाकिस्तान सुती कापड, तंबाखू व चामडयाचे पदार्थ यांच्या निर्याती बाबत भारताशीं चढाओढ करण्यांत चांगलें यश मिळविणार अशीं चिन्हें दिसत आहेत. मँगेनीझ उत्तरोत्तर आपल्याच देशांत जास्त लागणार. या पदार्थांची निर्यात घटल्यास ती तूट इतर पदार्थांच्या निर्यातीनें भरून काढण्यासाठीं विजेचे पंखे, सायकली, शिवण्याचीं यंत्रें, प्लॅस्टिकचे पदार्थ, चॉकोलेट, गोळया या सारखे सुके गोड पदार्थ, जोडे व बूट, लहान उद्योगधंद्यांना लागणाऱ्या विविध वस्तू, यांच्या निर्यातींत अलीकडे सुधारणा दिसून येत आहे. तींत वाढ









होण्याच्या दृष्टीनें सरकारनें अधिक प्रयत्न करावयास हवेत. सीमेंट व साखर यांनाहि परदेशांत खूप मागणी आहे. या दोन वस्तू आपल्याच देशांत खूप लागत असल्यानें त्यांची निर्यात केल्यास आपल्या देशांतील लोकांना त्यांची टंचाई भासेल असे टीकाकारांचें म्हणणें आहे. परंतु या दोन पदार्थांच्या निर्यातीमुळें जर भरपूर परदेशीं हुंडणावळ मिळणार असेल तर देशांतील लोकांनीं थोडी झीज सोसावयास हवी. रशियानें साखरेची निर्यात वाढवीत नेली ती देशांत साखर जास्त होती म्हणून नव्हे, तर परदेशी चलन मिळविण्यासाठीं ! ग्रेट ब्रिटनमध्यें मोटारींना आज खूप मागणी आहे. पण तरी सुद्धां परदेशीं चलन प्राप्त करण्यासाठीं इंग्लंड मोटारींची निर्यात मोठ्या प्रमाणावर करीत आहे.

## निर्यात-संशोधन-समिति

विविध वस्तूंची निर्यात कोणकोणत्या मार्गांनी वाढवितां येईल याचें संशोधन करण्यासाठीं कांहीं महिन्यांपूर्वी सरकारनें म्हैसूर विद्यापीठाचे कुलगुरु डॉ. डिसोझा यांच्या अध्यक्षतेखाली एक स्वतंत्र निर्यात-संशोधन-समिति नेमली. निर्यातीस उत्तेजन देण्यासाठीं निर्यात-व्यापाऱ्यांना आर्थिक साहाय्य किंवा कर्ज देतां येईल किंवा नाहीं, जकात आकारणीच्या आणि रेल्वे भाड्याच्या बाबतींत सवलती देणें उपयुक्त ठरेल कीं नाहीं, निर्यात पदार्थांचा दर्जा कसा नियंत्रित करतां येईल इत्यादि प्रश्नांचा ही समिति सांगोपांग अभ्यास करणार आहे.

गेल्या महिन्यांत निर्यात सल्लागार-समितिपुढें भाषण करतांना व्यापार आणि उद्योगमंत्री यांनीं निर्यातीस उत्तेजन मिळविण्यास अनुकूल अशा दोन महत्त्वाच्या घोषणा केल्या. निर्यात व्यापारांत अनेक अडचणी व संकटें येतात. कांहीं वेळां परदेशांतील खरेदी करणारा व्यापारी देणें बुडवितो किंवा वेळेवर पैसे चुकते करत नाहीं. यामुळें निर्यात व्यापाऱ्यांना आर्थिक झीज सोसावी लागते. या आर्थिक संकटापासून व्यापाऱ्यांचें संरक्षण करण्यासाठीं सरकार लवकरच एक नवी निर्यात-व्यापार-विमायोजना ( Export Risks Insurance Corporation ) सुरू करणार आहे. तसेंच निर्यातीस उत्तेजन मिळण्यासाठीं ज्या विविध ' अभिवृद्धि- ' समित्या स्थापन झालेल्या आहेत त्यांच्या कार्यांत एकसूत्रीपणा व अधिक कार्यक्षमता आणण्यासाठीं एक स्वतंत्र ' परदेशीय व्यापार-मंडळ ' स्थापन करण्यांत येणार आहे. एका स्वतंत्र निर्यात–अभिवृद्धि–अधिकाऱ्याची नेमणूक व्हावयाची असून त्यानें निर्यात–समित्यांचा व्यापाऱ्यांना कसा उपयोग करून देतां येईल हें काम मुख्यत्वेंकरून बघावयाचें आहे.

## व्यापारी नीति

दुसऱ्या महायुद्धाच्या अखेरीस भारताची स्टर्लिंग गंगाजळी मोठ्या प्रमाणावर सांठली होती. परंतु स्वातंत्र्योत्तर काळांत व पहिल्या पंचवार्षिक योजनेच्या कालावधींत भारतास मोठ्या प्रमाणावर आयात करावी लागल्यामुळें ही गंगाजळी घटत गेली व गेल्या १९ महिन्यांत तर ती २६९ कोटी रु. नीं घटली. निर्यात वाढविण्याच्या सरकारी प्रयत्नाला व्यापाऱ्यांच्या सहकार्याची जोड हवी. आपल्या मालाची प्रतिष्ठा वाढण्यासाठीं आणि मग त्यामुळें चांगली किंमत येण्यासाठीं आपल्या कारखानदारांनीं कार्यक्षमता, सचोटी, वक्तशीरपणा इत्यादि व्यापारी नीतीस आवश्यक असणाऱ्या गुणांचा अवलंब करावयास हवा आणि निर्यात व्यापाऱ्यांनींहि मागितलेला व चांगल्या दर्जाचा माल पाठविणें, भेसळ न करणें, पत्रव्यवहारांत सौजन्य, विक्रय-कौशल्य आणि वक्तशीरपणा दाखविणें, प्रसिद्धीचीं आधुनिक तंत्रें अंमलांत आणणें इत्यादि अजूनहि आपल्या व्यापारी जगतांत अभावानें तळपत असणाऱ्या गुणांचा पाठपुरावा करावयास हवा. त्यावांचून निर्यात-वाढीचा प्रश्न सुटणें कठीण आहे.









प्रा. गोवर्धन पारीख

# सहजीवनाचें आव्हान

[ ब्रिटिश मजूर पक्षाचे नेते ह्यू गेट्स्केल यांनीं नुकतींच हार्वर्ड विद्यापीठांत गॉड्किन् व्याख्यानें म्हणून तीन व्याख्यानें दिलीं. हीं व्याख्यानें 'सहजीवन' या विषयावर असून "The Challenge of Co-existence" या नांवानें तीं पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालीं आहेत. प्रस्तुत विषय अत्यंत जिव्हाळ्याचा असल्याकारणानें श्री. गेट्स्केल यांच्या विवेचनाचा सारांश येथें थोडक्यांत दिला आहे. – लेखक ]

## सहजीवनाचा अर्थ

"सहजीवन" ही अनेकांना वाटते त्याप्रमाणें एक रशियन घोषणा असली तरी तिचें पितृत्व क्रुश्चेव्ह किंवा स्टालिन यांच्याऐवजीं लेनिनकडेच जातें. बिनसाम्यवादी जगावर चौफेर हल्ला चढविण्याऐवजीं सोव्हिएट धोरण जेव्हां कांहीं राष्ट्रांशीं करारमदार करण्याचें व इतर कांहींवर दबाव टाकण्याचें स्वरूप धारण करतें तेव्हां तो सहजीवनाचा काळ होय. लेनिननें प्रथम याच अर्थानें प्रस्तुत संज्ञेचा उपयोग केला आहे. त्याच्या मताप्रमाणें सहजीवन हा एक साम्यवादी डावपेंचाचाच भाग असून त्याचें महत्त्व तात्पुरतेंच होतें. भांडवलशाही अखेरीस कोलमडून पडणारच; साम्यवादी जगाला भांडवलशाही राष्ट्रांशीं युद्ध करावें लागणें अपरिहार्य आहे. तथापि त्यांच्यांतील अंतर्गत विरोध विकोपास जावेत व त्यांचें सामर्थ्य कमी व्हावें या हेतूनें खेळाव्या लागणाऱ्या डावपेंचांत सहजीवनाला स्थान आहे अशी ही लेनिनप्रणीत विचारसरणी आहे. कांहीं वर्षांपूर्वीं रशियन नेत्यांनीं ही कल्पना जेव्हां पुढें मांडली तेव्हां त्यांचा हेतु देखील वरील प्रमाणेंच असावा असें म्हणतां येईल. सर्वत्र सारख्याच आक्रमक वृत्तीनें चालविण्यांत येणाऱ्या शीतयुद्धाचें स्वरूप बदलत असल्याची ती एक सूचक घोषणा होती. युरोपमध्यें "जैसे थे" कायम राखून आशिया व आफ्रिका खंडांतील कोणत्याहि बाजूस सामील न झालेल्या राष्ट्रांची मैत्री संपादन करणें आणि प्रचाराच्या चलाखीनें व्यापार व अन्य साधनांनीं या प्रदेशांत शीतयुद्धाची तीव्रता वाढविणें असा त्या बदलत्या धोरणाचा अर्थ होता. कोरियांतील युद्धतहकुबी, ऑस्ट्रियाशीं करार करून तेथील सैन्य मागें घेणें, फिनलँडला परत केलेला लष्करी तळ, इंडोचायनाबाबतचा जिनेव्हा येथील समझोता, टिटोची 'मनधरणी' इत्यादि घटना वरील बदल दर्शवितात.

या बदलाचीं तीन कारणें सांगतां येतील. पश्चिम युरोपांतील राष्ट्रांच्या ऐक्यामुळें व वाढत्या लष्करी सामर्थ्यामुळें कडक धोरण पराभूत झालें होतें. दुसरें म्हणजे आशिया व आफ्रिकेंतील राष्ट्रांच्या व विशेषतः भारताच्या वाढत्या महत्त्वाची मॉस्कोंत जाणीव होऊं लागली होती. व तिसरें म्हणजे सगळें जग साम्यवादी बनविण्याची रशियन नेत्यांची निष्ठा जरी कायम असली तरी अण्वस्त्रांमुळें भांडवलशाही व साम्यवाद यांतील अंतिम लढा त्यांना प्रत्यहीं अधिकाधिक असंभवनीय वाटूं लागला होता. त्याबरोबरच रशियांतील अंतर्गत परिस्थितीहि या बदलाला जबाबदार असावी. तिचें निश्चित स्वरूप सांगणें कठीण असलें तरी क्रुश्चेव्हनें केलेल्या स्टालिनवरील हल्ल्यामुळें अनेक पक्षसदस्यांना धक्का बसला असला पाहिजे हें मात्र निश्चित ! "सामुदायिक नेतृत्वाच्या" कल्पनेमुळें गुप्त पोलिसांचें सामर्थ्य












कमी झालें आणि त्यामुळें अंकित राष्ट्रांतील ' नामधारी ' सरकारांच्या सत्तेचा बोजवारा उडूं लागला. तेथें रशियाकरवीं होणाऱ्या आर्थिक शोषणामुळें हलाखीची परिस्थिति होतीच. त्यांतच लक्षावधि राजबंद्यांच्या मुक्ततेमुळें प्रस्थापित राजवटींची टीका वाढूं लागली. खुद्द रशियांत तंत्रविद्येचें शिक्षण घेऊन तयार होणाऱ्या लक्षावधि सुशिक्षित तरुणांमध्यें राजकीय प्रश्नांबाबत जागरूकता निर्माण होणें अटळ होतें. त्याचप्रमाणें नव्यानें निर्माण झालेल्या नोकरशाही व विविध व्यवसायांतील लोकांना आपल्या महत्त्वाची जाणीव होत असून वैचारिक व भाषण स्वातंत्र्याची मागणी करण्याच्या प्रवृत्तीची वाढ होऊं लागली आहे. पोलादी पडदा थोडासा सैल होऊं लागल्यामुळेंहि या प्रवृत्तीस उत्तेजन मिळालें असण्याचा संभव आहे.

दरम्यानच्या काळांत अनेक इतर राष्ट्रें देखील सहजीवनाच्या कल्पनेचा विचार करूं लागलीं. या बाबतचें सर्वांत महत्त्वाचें निवेदन पाश्चात्त्य राष्ट्रांऐवजी पौर्वात्य राष्ट्रांकरवीं बांडुंग परिषदेनें मान्य केलेल्या दहा तत्त्वांच्या रूपानें निघालें आहे. संयुक्त राष्ट्रसंघटनेच्या सनदेला मान्यता, सर्व लहानमोठ्या राष्ट्रांचा समान दर्जा, प्रादेशिक गटांचा विरोध व तटस्थतेच्या धोरणाला संमति आणि वसाहतवादाचा विरोध ( यांत रशियन वसाहतवादाचाहि विरोध अंतर्भूत आहे ) हीं या निवेदनाचीं वैशिष्ट्यें होत. सहजीवनाची ही कल्पना अधिक यथार्थ आहे. तिचा साम्यवादाच्या कल्पनेशीं संबंध नाहीं. म्हणून सहजीवनाचें आव्हान हें अधिक व्यापक बनलें आहे. केवळ तिसरें जागतिक युद्ध कसें टाळावयाचें एवढ्यापुरतेंच हें आव्हान मर्यादित नाहीं. आंतरराष्ट्रीय कलह शांततेनें मिटविले, जगण्या व जगूं देण्याच्या वृत्तीचा परिपोष झाला, साम्यवादाशीं वैचारिक सामना केला म्हणजे कार्यभाग संपला असें नाहीं; तर या सर्व गोष्टी करीत असतानांच आज ज्यांना खरेंखुरें स्वराज्य व व्यक्तिस्वातंत्र्य उपभोगावयास मिळत नाहीं, त्यांना तें मिळवून देण्याचा प्रश्नहि आपणांस सोडवावा लागेल. या दृष्टीनें या प्रश्नाचा विचार संयुक्त राष्ट्रसंघटना, युरोप आणि कोणत्याहि गटांत सामील न झालेलीं आशिया-आफ्रिका खंडांतील राष्ट्रें या तीन प्रमुख क्षेत्रांच्या दृष्टीनें आपणांस करावा लागेल.

## संयुक्त राष्ट्रसंघटना

संयुक्त राष्ट्रसंघटनेचा विचार प्रस्तुत संघटनेची सनद आणि त्यांतील विविध संघटनांचें प्रत्यक्ष कार्य या दोन्ही दृष्टींनीं करतां येईल. सनदेचा प्रश्न म्हणजे विविध सभासद राष्ट्रांच्या वर्तनक्रमाचा प्रश्न होय. या बाबतींत सनदेंत कांहीं नियम घालून देण्यांत आले आहेत. त्यांतील महत्त्वाचा प्रश्न म्हणजे राष्ट्रांनीं लष्करी सामर्थ्याचा उपयोग करण्याविषयीचा होय. सशस्त्र हल्ला झाल्यास सदस्य राष्ट्रानें स्वसंरक्षणासाठीं किंवा दुसऱ्या राष्ट्राच्या संरक्षणासाठीं लष्करी सामर्थ्य उपयोगांत आणावयास हरकत नाहीं; मात्र अशा घटनेची माहिती त्या राष्ट्रानें तातडतोब सुरक्षा मंडळास दिली पाहिजे, आणि मंडळानें आदेश दिल्यास लष्कराचा उपयोग थांबविला पाहिजे असें सनद सांगते. त्याचप्रमाणें सुरक्षा मंडळानें लष्करी दडपण आणण्याचें ठरविल्यास वा जनरल असेंब्लीनें २/३ किंवा अधिक बहुमतानें संमति दिल्यास अशा सामर्थ्याचा उपयोग केला जाऊं शकतो. सनदेची भूमिका सर्वस्वीं शांततेची आहे असें नाहीं. तथापि लष्करी सामर्थ्याच्या उपयोगाबाबतची भूमिका आवश्यक तितकी स्पष्ट नाहीं. उदाहरणार्थ, सशस्त्र हल्ला कशास म्हणावयाचें ? सरहद्दीवर धाड आल्यास तो सशस्त्र हल्ला म्हणतां येईल काय ? त्याचप्रमाणें सनदेंत युद्धाचा संभव टाळण्यासाठीं लष्करी सामर्थ्याचा उपयोग करण्यास परवानगी नाहीं. तथापि याबाबतींत इस्रायलसारख्या राष्ट्राची भूमिका सर्वथैव चुकीची आहे असें म्हणतां








येणार नाहीं. त्याचप्रमाणें सनदेंत नागरी अपराधाचा मुकाबला करण्यासाठीं कसलीहि सवलत नाहीं. यामुळें प्रत्यक्ष हल्ला न करतां एखाद्या राष्ट्रास दुसऱ्याचें गंभीर स्वरूपाचें नुकसान करतां येणें शक्य आहे. त्याचप्रमाणें शांततेच्या मार्गानें प्रस्थापित व्यवस्थेंत बदल घडवून आणण्यासाठीं देखील सनदेंत मुळींच अवकाश नाहीं. अर्थात् या सर्व टीकेचा अर्थ असल्या परिस्थितींत संयुक्त राष्ट्र-संघटना कांहींच करूं शकणार नाहीं असा मात्र नव्हे. संयुक्त राष्ट्रसंघटनेची सनद अत्यंत विचार-पूर्वक तयार करण्यांत आली आहे. तिच्यांतील शब्द-रचना कांहीं ठिकाणीं अस्पष्ट असेल, नाहीं असें नाहीं. तथापि त्या बाबतींत अधिक स्पष्ट असा पर्यायहि आढळत नाहीं.

प्रस्तुत संघटनेंतील विविध शाखांच्या कार्यप्रणालीचा विचार करूं लागलों म्हणजे प्रथम सुरक्षा मंडळांतील कायम सभासदांच्या व्हेटोचा प्रश्न पुढें येतो. यामुळें लहानसहान लढाया, ' मोठ्या ' राष्ट्रांचा त्यांच्याशीं संबंध नसल्यास किंवा त्यांच्यांत एकमत झाल्यास, थांबविणें सुरक्षा मंडळास शक्य होतें. एरव्हीं सुरक्षा मंडळ कांहींहि करूं शकत नाहीं. मध्यपूर्वेतील गेल्या आक्टोबरमधील लढाई, ब्रिटन व फ्रान्स यांनीं व्हेटोचा उपयोग केला नसता तर कदाचित सुरक्षा मंडळास थांबविताहि आली असती. कोरियांतील लढाईचें उदाहरण या बाबतींत निरुपयोगी आहे. रशिया सुरक्षा मंडळाच्या बैठकीस हजर न राहिल्यामुळें घडलेली ती एक आकस्मिक घटना होती.

मुळांत सनदेच्या दृष्टीनें आक्रमणाचा प्रतिकार करण्याचा अधिकार असेंब्लीकडे फारसा नव्हताच. तथापि १९५० सालच्या " शांततेसाठीं ऐक्य " करण्याच्या ठरावामुळें या बाबतींत मोठा बदल घडून आला आहे. आणि यापुढें निदान मोठ्या आक्रमणांचा प्रश्न तरी सुरक्षा मंडळाऐवजीं असेंब्लीद्वाराच हाताळला जाईल असा संभव निर्माण झाला आहे. तथापि त्यासाठीं एकतर २/३ बहुमत लागेल; आणि दुसरें म्हणजे या बहुमताकडे देखील केवळ तांत्रिक दृष्टीनें पाहून भागणार नाहीं. एखादें बडें राष्ट्र अशा झगड्यांत असल्यास सामुदायिक संरक्षणाचें पाऊल टाकतांना त्यांतील धोकाहि असेंब्लीस विचारांत घ्यावा लागेल. या सर्व अडचणींमुळें संयुक्त राष्ट्रसंघटनेच्या स्वरूपांत सुधारणा करण्याचा प्रश्न अलीकडे बराच चर्चिला गेला आहे; आणि कांहींनीं तर ' व्हेटो'चा अधिकार काढून घेण्याचीहि सूचना केली आहे. तथापि ही सूचना रशिया व अमेरिका या दोहोंनाहि संमत नाहीं. आणि समजा, व्हेटो नाहींसा झाला; तरीदेखील आक्रमणाचा प्रतिकार करण्याचे निर्णय बहुमतानें घेतले जातीलच असें समजण्याचें कारण नाहीं. या बाबतींत खरा प्रश्न जागतिक युद्धाचा धोका पत्करायचा कीं नाहीं हाच होय.

## ' शांततेसाठीं ऐक्याचा ' ठराव

" शांततेसाठीं ऐक्य " ह्या ठरावांतील भूमिका व्हेटोची अडचण दूर करण्याचीच आहे; आणि तो हेतू थोड्याबहुत प्रमाणांत साध्यहि झाला आहे. तथापि त्यांतून असेंब्लीनें बहुमतानें घेतलेल्या निर्णयांची अंमलबजावणी करण्यासाठीं आवश्यक असलेल्या सामर्थ्याचा प्रश्न निर्माण होतो. याद्दष्टीनें इजिप्तमध्यें सध्यां असलेलें आंतरराष्ट्रीयदल ही एक पहिलीच फार मोठी कामगिरी होय. इंग्लंड व फ्रान्स यांना त्यामुळें आपलें सैन्य मागें घ्यावें लागलें असून इजिप्त व इस्त्रायल यांच्या सेनांना एकमेकांपासून दूर ठेवण्याचें कार्य करतां आलें आहे. तथापि एकतर हें दल युद्धासाठीं उपयोगांत आणण्याच्या हेतूनें उभारलें गेलें नाहीं; दुसरें म्हणजे संख्याबल व शस्त्रास्त्रें या दोन्ही दृष्टींनीं तें अत्यंत दुर्बल आहे; आणि तिसरें म्हणजे तें पूर्णतया तात्पुरत्या स्वरूपाचें असून संबंधित राष्ट्रांच्या












संमतीनेंच तेथें राहिलें आहे. यामुळें एखाद्या बड्या व दुराग्रही आक्रमक राष्ट्राविरुद्ध हा मार्ग कितपत व्यवहार्य ठरेल हा एक प्रश्नच आहे. तात्पर्य, अशा प्रकारचें दल एकतर दुर्बल तरी असेल आणि त्यामुळें तें केवळ नैतिक दबाव आणूं शकेल; नाहींतर तें सबळ वा सामर्थ्यवान करावयाचें म्हटल्यास त्यावर अधिकार कोणाचा राहील, त्याचा उपयोग निश्चितपणें केव्हां व कसा केला जाईल इत्यादि प्रश्न सोडवावे लागतील. तूर्त तरी अशाप्रकारचें सामर्थ्यवान दल उभारण्याच्या प्रश्नाचा विचार करण्यास एकहि ' बडें ' राष्ट्र तयार नाहीं असें दिसतें.

## संयुक्त राष्ट्रसंघटनेचें महत्त्व

तूर्त तरी संयुक्त राष्ट्रसंघटना अत्यंत मर्यादित प्रमाणांतच प्रभावी होऊं शकेल असें दिसतें. तिच्याविषयीं अवास्तव अपेक्षा बाळगणें वा गैरसमज करून घेणें चुकीचें होय. तथापि या मर्यादा जमेस धरून देखील सहजीवनाचें आव्हान स्वीकारण्याच्या कार्यांत या संघटनेस महत्त्वाची कामगिरी बजावतां येईल असें वाटतें. एक तर लष्करी सामर्थ्याचा उपयोग केव्हां करायचा आणि केव्हां नाहीं या संबंधीं राष्ट्रांच्या वर्तनक्रमाला कांहीं नियम असणें हीच मुळीं महत्त्वाची बाब आहे. दुसरें म्हणजे बरेंच मोठें बहुमत असेल तेव्हां तरी निदान जागतिक लोकमत असेंब्लीच्या निर्णयांच्या द्वारें व्यक्त होऊं शकतें. तिसरें म्हणजे असेंब्लीच्या सभासदांत जरी निश्चित गट असले तरी तें कांहीं विनाशक स्वरूपाचें दौर्बल्य होऊं शकत नाहीं. उलट तेथें बरींच स्वतंत्र दृष्टीनें विचार करणारीं राष्ट्रेंहि आहेतच आणि अमेरिकेला याची दिवसेंदिवस वाढती जाणीव हि होत आहे. चौथें म्हणजे जागतिक राज्याची कल्पना ही जरी अजून दूरच्या ध्येयसृष्टींत असली तरी सर्व राष्ट्रांनीं एकत्र बसून कलह वा मतभेदाबाबत विचारविनिमय करून निर्णय घेणें ही गोष्ट मात्र आज व्यवहार्य वाटूं लागली आहे. आणि हें चित्रहि फाजील आशावादाचें वाटल्यास व साम्यवादी आणि बिनसाम्यवादी राष्ट्रांतील झगडा आजच्या सारखाच पुढेंहि चालूं राहील असें गृहीत धरल्यास देखील या दोन्ही विचारप्रणालीच्या राष्ट्रांनीं एकत्र येणें व बोलणें याला देखील महत्त्व आहेच. एकमेकांचें योग्य आकलन होण्याची ही पहिली पायरीच म्हणावयास हरकत नाहीं. सहावा मुद्दा संयुक्त राष्ट्रसंघटनेंतील राजकीय कार्याव्यतिरिक्त अन्य कार्य करणाऱ्या शाखांचा. तांत्रिक वा आर्थिक साहाय्यासारखे प्रश्न राजकीय सत्तासंबंधापासून अलिप्त ठेवण्याचें महत्त्वाचें कार्य त्यांच्यामुळें होत आहे. आणि याशिवाय कित्येकवेळां अत्यंत कठिण स्वरूपाचे प्रश्न सोडविण्याचें कार्य आपल्या विशिष्ट स्वरूपामुळें संयुक्त राष्ट्रसंघटना सोडवूं शकली आहे हेंहि ध्यानांत घेणें जरूर आहे. मध्यपूर्वेतील युद्ध हा याचा महत्त्वाचा दाखला होय. मात्र लहान राष्ट्रावर अन्य वा बड्या राष्ट्रांकरवीं बिनलष्करी स्वरूपाचें आक्रमण वा अन्याय झाल्यास त्यावर अजून तरी परिणामकारक उपाय दिसत नाहीं.

## प्रादेशिक करार : नाटो

संयुक्त राष्ट्रसंघटनेच्या स्वरूपाचा साकल्यानें विचार केल्यास व विशेषत: सुरक्षेच्या दृष्टीनें तिचें दौर्बल्य विचारांत घेतल्यास बड्या राष्ट्रांमधील मतभेद जेथें विकोपास गेले आहेत व आक्रमणाची संभाव्यता अधिक आहे अशा भागातील प्रादेशिक संरक्षण करारांना तिच्या योगानें उत्तेजनच मिळत असल्याचें दिसून येईल. लहान लहान स्वतंत्र लोकशाही राष्ट्रांच्या अस्तित्वामुळें ह्या करारांची गरज निर्माण होते. नाटोबद्दलहि असेंच म्हणता येईल. सत्तेचा समतोलपणा कायम राखणें हा अशा करारांचा हेतू होय. संयुक्त राष्ट्रसंघटनेंतील शांततारक्षणाची पद्धति ही आदर्श पद्धति झाली. तिलाच पूरक म्हणून अधिक वास्तववादी अशी सत्तेच्या समतोलपणाची ही कल्पना स्वीकारली पाहिजे. सत्तेचा समतोलपणा










राखण्याच्या कल्पनेंतून युद्ध उद्‌भवतें असें नसून उलट आक्रमणाची आकर्षकता कोणत्याहि राष्ट्राला वा राष्ट्रसमूहाला वाटणार नाहीं अशी परिस्थिति निर्माण करणें हा तिचा उद्देश आहे. बऱ्या राष्ट्रांत गंभीर स्वरूपाचा कलह आहे हें कोणीहि नाकारीत नाहीं. तथापि दुसऱ्या महायुद्धानंतर आरंभी-आरंभीच्या काळांत अमेरिकेजवळ अणुबॉंब असल्यानें रशिया पश्चिम युरोपांत प्रगति करूं शकला नाहीं. तथापि नंतर लवकरच अण्वस्त्रें रशियालाहि उपलब्ध झालीं व त्यांच्या उपयोगाची शक्यता दुरावूं लागली. यामुळें यापुढें आक्रमणाचा विचार जुन्या स्वरूपाच्या लष्करी सामर्थ्याच्या दृष्टीनें करणें क्रमप्राप्त झालें. आणि हें सामर्थ्य वाढविणें पाश्चात्य राष्ट्रांच्या दृष्टीनें आवश्यक झालें. रशियाचें दडपण वाटूं लागल्यामुळें अमेरिकेच्या पाठिंब्याची युरोपीय राष्ट्रांना अधिकाधिक गरज वाटणेंहि स्वाभाविक होतें. आणि या पार्श्वभूमीवरच नाटोचा जन्म झाला.

खऱ्याखुऱ्या सहकार्यावर अधिष्ठित असलेला करार असें नाटोचें यथार्थ वर्णन करतां येईल. त्यांत सामील झालेल्या राष्ट्रांमध्यें अनेक बाबतींत साम्य आहे. तो पूर्णतया संरक्षक करार असून ज्या सरहद्दींचें संरक्षण करावयाचें त्या स्पष्ट आहेत. मर्यादित प्रमाणांत कां होईना, परंतु हा करार यशस्वी झाला असून आक्रमण झाल्यास त्याचा प्रतिकार होण्याची निश्चिती त्याच्या योगानें निर्माण झाली आहे. शिवाय अमेरिकेचें सैन्यहि युरोपांत असणें ही वस्तुस्थिति असून अशा प्रकारची जबाबदारी अमेरिकेनें प्रथमच पत्करली आहे. नाटोबरोबरच औद्योगिक, आर्थिक व राजकीय दृष्टींनीं अमेरिका व युरोप, युरोपांतील निरनिराळीं राष्ट्रें व ब्रिटन व युरोप यांचे संबंध अधिकाधिक जवळचे होत आहेत. आज युरोपांत थोड्याबहुत प्रमाणांत आढळणाऱ्या ऐक्याच्या भावनेची जोपासना नाटोमुळेंच शक्य झाली आहे.

वास्तविक रशियाच्या बरोबरीनें परंपरागत लष्करी सामर्थ्याची उभारणी करण्याचा नाटो राष्ट्रांचा हेतु मुळीं नव्हताच. केवळ आक्रमणाचा संभव टाळण्याइतकेंच सामर्थ्य त्यांना निर्माण करावयाचें होतें. तथापि परंपरागत पद्धतीनें उपयोगांत आणण्याजोगीं अण्वस्त्रें उपलब्ध होण्याचा संभव निर्माण झाल्यामुळें हें लक्ष्य देखील शेवटीं उरलें नाहीं. ८५ तुकड्यांऐवजीं ( डिविजन्स ) ३० तुकड्या उभारण्याचें ठरलें व त्याहि अजून उभारल्या गेलेल्या नाहींत. आणि ज्या आधारावर हा बदल झाला त्या लष्करी डावपेचांना उपयुक्त अशा अण्वस्त्रांच्या बाबतींत अजून गोंधळाचीच परिस्थिति आहे. हैड्रोजन बॉंब हा केवळ अमेरिकेजवळच असून त्याचा उपयोग सर्वस्वीं तिच्या इच्छेवर अवलंबून आहे. ही परिस्थिति असमाधानकारक वाटल्यामुळेंच ब्रिटननें अशा प्रकारचा बॉंब तयार करण्याचें हातीं घेतलें आहे. तथापि युरोपीय संरक्षणाची प्रत्यक्ष तरतूदहि अजून अत्यंत असमाधानकारकच आहे.

नाटोच्या दौर्बल्याचें दुसरें कारण म्हणजे त्यांत सामील झालेल्या राष्ट्रांचे युरोपबाहेरील हितसंबंध हे होय. या हितसंबंधामुळें त्यांच्यांतील सहकार्यावर अनेक वेळां ताण पडला आहे. कोरियांतील युद्ध किंवा नवचीनचा संयुक्त राष्ट्रसंघटनेंतील प्रवेश याबाबतचा अमेरिका व युरोपचा दृष्टिकोण, उत्तर आफ्रिकेंतील फ्रान्सच्या धोरणामुळें फ्रान्स व अमेरिका आणि फ्रान्स व ब्रिटन यांच्यांतील मतभेद, मध्यपूर्वेतील प्रश्नांबाबत ब्रिटन व अन्य राष्ट्रांचे मतभेद, सायप्रस प्रश्नावरील ग्रीस व तुर्कस्थान यांजमधील वितुष्ट इत्यादि उदाहरणें नमूद करण्यासारखीं आहेत. या युरोपबाह्य प्रश्नांचेहि लष्करीदृष्ट्या परिणाम होणें अपरिहार्य आहे. जगांतील अन्य भागांत आपापल्या धोरणाप्रमाणें वागावें व युरोपीय संरक्षणाबाबतच्या जबाबदारीचा आपापला वांटा उचलण्याचा प्रश्न आला म्हणजे तें धोरण सबब किंवा कामगिरी म्हणून पुढें मांडावें अशीच प्रत्येक राष्ट्राची समजूत झालेली दिसते !








नाटोचें दौर्बल्य युरोपविषयकच्या धोरणांतहि आहेच. त्यांतील मुख्य प्रश्न म्हणजे जर्मन एकीकरणाचा प्रश्न होय. पश्चिम जर्मनीला हें एकीकरण अत्यंत आवश्यक व जिव्हाळ्याचें वाटतें; तथापि इतर राष्ट्रांची—आणि विशेषत: जर्मन आक्रमणाचा प्रत्यक्ष अनुभव घेतलेल्या राष्ट्रांची—त्याबद्दलची दृष्टि विशेष सहानुभूतीची नाहीं. यामुळें जर्मनींत असंतोष आढळणें स्वाभाविक आहे. रशियाशीं स्वतंत्रपणें करार करण्याकडे जर्मनीचा कल झुकल्यास त्यांत आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं.

## सोविएट युनियनच्या अडचणी

तथापि पाश्चात्त्य राष्ट्रांपुढें ज्याप्रमाणें अनेक प्रश्न व अडचणी आहेत तशाच त्या सोविएट युनियन पुढेंहि आहेत. आणि ही गोष्ट हंगेरियन व पोलिश जनतेच्या अतुलनीय धैर्यानें व शौर्यानें स्पष्ट केली आहे. रशियाच्या अंकित असलेल्या राष्ट्रांतील जनतेच्या खऱ्याखुऱ्या भावना काय आहेत; तेथील सरकारें हीं रशियन लष्करी सामर्थ्यावरच कशीं अवलंबून आहेत; त्या सामर्थ्याशीं देखील मुकाबला करणें कसें शक्य आहे इत्यादि प्रश्नांवर त्यांनीं स्वच्छ व विदारक प्रकाश टाकला आहे. रशियाला लष्करी सामर्थ्याचा उपयोग करण्यास भाग पाडून त्यांनीं सगळीकडे साम्यवादी पक्ष व प्रचार यांची नाचक्की केली आहे. आणि पाश्चात्त्य राष्ट्रांतील निराशेचें वातावरण नाहींसें केलें आहे. सर्वंकष हुकूमशाही मानवी स्वातंत्र्यलालसा नष्ट करूं शकते ही भीति त्यांनीं निराधार ठरविली आहे.

पोलंड व हंगेरींतील बंडांचीं तीन प्रमुख कारणें सांगतां येतील. पहिलें म्हणजे दोन्ही देशांतील अगदीं असह्य स्वरूपाची आर्थिक परिस्थिति. रशियाच्या आत्यंतिक शोषणाच्या आर्थिक धोरणांतील खुलेपणाचाच तो परिपाक होता. दुसरें कारण म्हणजे राजकीय दडपशाही. याची जाणीव दोन्ही राष्ट्रांतील—विशेषत: हंगेरींतील बुद्धिजीवी वर्गांत अधिक आढळते. व तिसरें म्हणजे हीं बंडें राष्ट्रवादावर आधारलेलीं होतीं. रशियाचा म्हणजे परकीय सत्तेचा प्रतिकार करणें हें त्यांचें उद्दिष्ट होतें. या बंडांत पाश्चात्त्य राष्ट्रांनीं हस्तक्षेप करावयास हवा होता कीं नव्हता हा स्वतंत्र प्रश्न आहे. खरें म्हणजे तेथें निर्माण झालेली परिस्थिति ही पाश्चात्त्य राष्ट्रांच्या राजकीय वा संरक्षणविषयक नियोजनांत मुळीं जमेसच धरली नव्हती.

या बाबतींत रशिया पुढें काय करील असा प्रश्न साहजिकच उद्भवतो. अंकित राष्ट्रांतील आर्थिक परिस्थिति सुधारण्याचे प्रयत्न होतीलसें वाटतें; व त्यांचा अनुकूल परिणाम होईलहि. त्याचप्रमाणें थोडें-बहुत राजकीय स्वातंत्र्यहि दिलें जाईल. तथापि थोडेसें स्वातंत्र्य दिल्यानें तें अधिकाधिक मागण्याची प्रवृत्तीच बळावते. अशा अवस्थेंत हे देश आपल्या ताब्यांत ठेवण्याचा प्रयत्न रशियानें करणें म्हणजे तेथील असंतोष अधिकच वाढविणें होय. रशियांत पुन: स्टालिनवाद प्रभावी होणें कठीणच ! एकतर तेथें आतां स्टालिन नाहीं. आणि दुसरें म्हणजे केवळ अंकित राष्ट्रेंच नव्हत तर खुद्द रशिया देखील आतां त्या वादापासून पुष्कळच दूर गेला आहे. कदाचित् तेथें लष्करी हुकूमशाही प्रस्थापित होण्याचा संभव आहे. पण तिला अंकित राष्ट्रांत स्थानिक पाठिंबा फारसा मिळणार नाहीं. अंकित राष्ट्रें व खुद्द रशिया येथें प्रत्यहीं बळावत असलेल्या विचारांच्या आंदोलनामुळें अस्थिर परिस्थितीच येथें कायम रहाण्याचा संभव आहे. हें गृहीत धरून पाश्चात्त्य राष्ट्रांनीं युरोपांत कोणतें धोरण ठेवावें हा खरा प्रश्न आहे.

## पाश्चात्त्य राष्ट्रांचें धोरण काय असावें ?

पहिला प्रश्न जर्मनीचा. त्याबाबत आजचीच परिस्थिति चालू रहाणें कठीण आहे. आजची राजवट बदलून तेथें लवकरच वेगळी राजवट सुरू होण्याचा संभव आहे. आणि पाश्चात्त्य राष्ट्रांना जर्मन एकीकरणाविषयीं पुनश्च प्रयत्न करावे लागतील,












नाहींतर अप्रत्यक्षपणें कां होईना पण रशियाशीं बोलणीं सुरू करण्याकडे जर्मनीचा कल झुकेल. दुसरें म्हणजे पश्चिम जर्मनीजवळ आतां सैन्य असल्यामुळें पूर्व जर्मनींत बंडाळी झाल्यास तेथील आपल्या बांधवांच्या साहाय्यासाठीं तो जाण्याचा संभव आहे. अशा परिस्थितींत रशियानेंहि हस्तक्षेप करावयाचें ठरविल्यास नाटो राष्ट्रें काय करणार ? रशियाच्या दृष्टीनें देखील पूर्व जर्मनींत बंडाळीं होणें धोक्याचेंच आहे. परंतु त्याबरोबरच तेथील साम्यवादी पक्षावर कडक नियंत्रण ठेवणें हें देखील, पोलंड व हंगेरीमधील अनुभव जमेस धरल्यास, त्यांना अडचणीचेंच आहे. यामुळें तसाच प्रसंग आल्यास गुण्यागोविंदानें अंकित राष्ट्रांतून आपलें सैन्य काढून घ्यावयास रशिया तयार होणारच नाहीं असें नाहीं. या दृष्टीनें प्रयत्न करावयाचे म्हटल्यास १९५५ सालीं ईडन यांनीं मांडलेल्या योजनेचा कांहींशा व्यापक स्वरूपांत विचार होणें जरूर आहे. जेथें कोणतेंहि परकीय सैन्य नाहीं असा जर्मनीमध्यें एक पट्टा तयार करण्याची कल्पना त्या वेळीं होती. तोच पट्टा व्यापक करून सर्व जर्मनी, पोलंड, झेकोस्लोवाकिया, हंगेरी व शक्य तर रुमानिया व बल्गेरिया यांचाहि त्यांत अंतर्भाव करण्याची कल्पना फारशी अव्यवहार्य वा अडचणीची ठरेल असें वाटत नाहीं. अर्थात् तूर्त तरी ही एक अत्यंत स्थूल स्वरूपांत पुढें मांडलेली कल्पना होय हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

दुसरा प्रश्न युरोपीय ऐक्याचा ! ब्रिटन याबाबत कोणतें धोरण स्वीकारणार असा प्रश्न वेळोवेळीं विचारला जातो. अर्थात् युरोपीय संरक्षणाच्या प्रश्नाबाबतचा आपला वाटा ब्रिटननें स्वीकारलाच आहे. इतर युरोपीय संघटनांतहि तें सामील झालें आहे. युरोपमधील " मुक्त व्यापाराचा प्रदेश " निर्माण करण्याच्या सूचनेलाहि ब्रिटीश लोकमत बरेंच अनुकूल आहे. ब्रिटनचे युरोपशीं सामाजिक व सांस्कृतिक संबंध देखील अलीकडे खूपच वाढले आहेत. यासर्व गोष्टी जरी खऱ्या असल्या तरी ब्रिटन हें अजून राष्ट्रकुलाचें केंद्र आहे. आणि युरोपमधील कांहीं राष्ट्रांशीं तरी त्याचे वसाहतींच्या भवितव्याबाबत मौलिक स्वरूपाचे मतभेद आहेत. अमेरिकेशींहि त्याचे संबंध वैशिष्टयपूर्ण आहेत. पुन: युरोपच्या हद्दी नेमक्या कोणत्या हाहि एक प्रश्नच आहे. युरोपमधील कांहीं देशांतील राजकीय जीवन ब्रिटनहून पुष्कळच भिन्न आहे. भाषेचाहि प्रश्न आहेच. यामुळें युरोपशीं ब्रिटनचे संबंध आजच्यासारखेच निकटवर्ती राहतील. परंतु युरोपीय सामाजिक जीवनांत सामील होण्यास मात्र ते तयार होणार नाहींत. त्यासाठीं अमेरिकाहि त्यांत सामील होणें आवश्यक आहे.

## ' तटस्थ ' राष्ट्रांचा प्रश्न

आतां तटस्थ राष्ट्रांच्या प्रश्नाकडे वळूं. तटस्थ ( Uncommitted ) राष्ट्रें म्हणजे पाश्चात्यराष्ट्रांशीं कसल्याहि लष्करी करारानें बांधलीं न गेलेलीं राष्ट्रें. अर्थात् अशीं राष्ट्रें कोणतीं हें ठरविणें फारसें सोपें नाहीं. कांहीं सीमेवरचीं उदाहरणेंहि त्यांत येणारच. इराक, इराण व पाकिस्तान बगदाद-करारांत सामील असूनहि त्यांत अंतर्भूत होऊं शकतील; तुर्कस्थान वगळावें लागेल; जपान अंतर्भूत करावें लागेल. सर्व वसाहतींचा देखील या गटांत समावेश करणें जरूर आहे; कारण तेथील राज्यकर्ते जरी पाश्चात्य असले तरी जनता कोणत्याहि बाजूस सामील झालेली नाहीं. या राष्ट्रांतील सर्वांत महत्त्वाचें राष्ट्र म्हणजे भारत हें होय. दुसरा महत्त्वाचा गट अरब राष्ट्रांचा. हे दोन्ही मिळून ४५ कोटी लोकसंख्या होते; व इतर राष्ट्रें जमेस धरल्यास एकूण सुमारें ६० कोटी. जगांतील एकूण लोकसंख्येच्या १/४ इतका हा आकडा आहे.












हीं बहुतेक राष्ट्रें अगदीं अलीकडच्या काळा-पर्यंत परतंत्र होतीं. पाश्चात्त्य राष्ट्रांच्या मानानें तीं दरिद्री आहेत. त्यांचें आर्थिक जीवन बव्हंशीं शेती-वरच अवलंबून असून औद्योगीकरणाच्या पूर्वीच्या अवस्थेंत तें आहे. अजूनहि तीं कच्चा माल निर्यात करतात. वर्णानें येथील लोक पाश्चात्त्यांच्या मानानें काळे असून त्यांच्यांत एकमेकांविषयीं ऐक्यभावना वाढत आहे. त्यांचें जागतिक राजकारणांतील महत्त्व दिवसेंदिवस वाढत जाणार असून आर्थिक विकासाच्या त्यांच्या प्रयत्नामुळें ही शक्यता कितीतरी बळावली आहे. यामुळें सहजीवनाच्या या अवस्थेंत सोव्हिएट रशियानें आपलें लक्ष या राष्ट्रांवर केंद्रित करावें यांत आश्चर्य नाहीं. अर्थात् रशियाचा तेथील भर प्रचार, राज-कीय संबंधांची जोपासना आणि आर्थिक शिरकाव यावरच आहे. या राष्ट्रांचा पाठिंबा मिळविण्यासाठीं "भांडवलशाही" राष्ट्रांशीं स्पर्धा करण्याची घोषणा क्रुश्चेव्ह यानें प्रसिद्ध केली आहे. या प्रदेशांत तरी "स्पर्धात्मक सहजीवनाचा" हा काळ आहे असें म्हटलें पाहिजे.

केवळ लष्करी दृष्टीनें विचार केल्यास साम्यवादी राष्ट्रांकरवीं हल्ला होण्यासारखे दोन भाग या प्रदेशांत आढळतात. एक म्हणजे मध्यपूर्वेंत इराण वा तुर्क-स्थान मधून हल्ला; व दुसरा म्हणजे दक्षिण आशि-यांत चीनमधून दक्षिणेस इंडोचायना, थायलँड किंवा ब्रह्मदेशांत हल्ला. तथापि दोन्ही ठिकाणीं अशा प्रकारचे हल्ले सध्याच्या परिस्थितींत अनेक कारणा-स्तव असंभाव्य वाटतात. यामुळें ज्या विशिष्ट परि-स्थितींत नाटो करार समर्थनीय वाटतो तशा प्रका-रची परिस्थिति या प्रदेशांत नाहीं. उलट संरक्षक स्वरूपाचे करार परिणामकारक होण्याच्या दृष्टीनें या प्रदेशांत कितीतरी तंत्रविद्येच्या व मानसिक अडचणी आहेत. शिवाय स्थानिक प्रजा बेपर्वाईनें वागत असल्यास वा विरोधी असल्यास आशियांत युद्ध किती बिकट होतें हें प्रसिद्ध आहे. म्हणून या प्रदे-शांत लष्करी प्रश्नाऐवजीं राजकीय प्रश्न हाच अधिक महत्त्वाचा म्हटला पाहिजे. लष्करी करारांचें देखील याच दृष्टिकोणांतून मूल्यमापन व्हावयास हवें. असे करार कांहीं वेळां साम्यवादविरोधी शक्तींच्या ठिकाणीं विश्वास उत्पन्न करूं शकतील, नाहीं असें नाहीं. पण उलट कांहीं वेळां त्यांना इतका विरोधहि होण्याचा संभव आहे कीं तें न करणेंच चांगलें वाटावें. कोणतेंहि सर्वसामान्य विधान मात्र अशा कराराबाबत करतां यावयाचें नाहीं.

### रशियाचे प्रयत्न

या प्रदेशांत आपलें वजन वाढविण्याचा प्रयत्न रशिया गेलीं कांहीं वर्षें करीत आहे. या प्रदेशाशीं त्याचा व्यापारहि अलीकडे पुष्कळच वाढला आहे. या प्रदेशांना आर्थिक नियोजनद्वारा आर्थिक विकास तातडीनें करावासा वाटतो; व त्यामुळें रशियाच्या विकासप्रयत्नांना ते आदर्शभूत समजतात. साम्य-वादी वैचारिक प्रचाराला तेथें अत्यंत अनुकूल वातावरण आढळतें. उलट येथील जनतेला हुकूम-शाहीच्या धोक्याची फारशी जाणीवहि नाहीं व भीतीहि वाटत नाहीं. रशियांत वंशभेदावर आधार-लेली दडपशाही नाहीं या थोड्याबहुत प्रमाणांत समर्थनीय असलेल्या कल्पनेचें येथें विशेष आकर्षण वाटतें. तथापि सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे पाश्चात्त्य राष्ट्रांविषयीं एकेकाळचे राज्यकर्ते म्हणून येथील जनतेला स्मरण आहे; रशियाचें तसें नाहीं. म्हणून येथील वसाहतवादाच्या विरोधाचें स्वरूप ध्यानांत घेतलें पाहिजे. हा विरोध व त्यांतून जन्मणारा आत्यंतिक द्वेष आहे तरी कशाबद्दल ? एक म्हणजे प्रत्यक्ष परकीय राजवटीबद्दल. अल्जिरिया वा भारतीय निर्देश करीत असलेला गोवा हीं याची उत्कृष्ट उदाह-रणें होत. तथापि हें कारण पुष्कळच कमी झालें असून प्रत्यहीं नाहींसें होत आहे. दुसरें महत्त्वाचें कारण म्हणजे बलाढ्य राष्ट्रें दुर्बल राष्ट्रांवर आपलें










म्हणणें लादतात ही परिस्थिति. वांशिक श्रेष्ठत्वाची कल्पना हें तिसरें महत्त्वाचें कारण; व चौथें म्हणजे आर्थिक विषमता हें होय. अशा प्रकारें पाश्चात्य राष्ट्रांच्या दृष्टीनें या प्रदेशांतील परिस्थिति अत्यंत अडचणीची आहे. त्यांतून मार्ग काढण्यासाठीं काय धोरण ठेवावें हा खरा प्रश्न आहे. कांहीं मूठभर लोकांना या प्रदेशांतील लोकांनीं स्वातंत्र्य दिलें हीच खरी चूक झाली असें वाटतें. परंतु हें म्हणणें खुळेंपणाचें असून तें इत:पर कोणीहि फारसें ऐकून घेणें शक्य नाहीं. देशांत लोकशाही राजवट ठेवायची असेल तर वसाहतींत प्रगमनशील धोरण स्वीकारलेंच पाहिजे. तसेंच या प्रदेशांतील राष्ट्रांना— विशेषत: भारताला— आंतरराष्ट्रीय राजकारणांत तटस्थतेची भूमिका घ्यावीशी वाटते. याचीं कारणें अनेक असून तीं सहानुभूतीनें समजून घेणें आवश्यक आहे.

### आर्थिक साहाय्याची गरज

या राष्ट्रांपुढील खरा म्हणजे लोकशाही राजकीय संस्था कायम राखून आर्थिक विकास झपाट्यानें कसा घडवून आणावयाचा हा होय. यासाठीं बाहेरून आर्थिक साहाय्य मिळणें हाच मार्ग शिल्लक रहातो. अर्थात् आर्थिक साहाय्य व विकास हा राजकीय स्वातंत्र्याचा पर्याय होऊं शकत नाहीं हें मात्र ध्यानांत घेतलें पाहिजे. किंबहुना आर्थिक विकास किंवा शिक्षणाचा प्रसार यांच्यामुळें राजकीय प्रश्न सुटण्याऐवजीं अधिकच विकट होत जाणें शक्य आहे. यासाठीं तेथें प्रगतीच्या सर्व गरजा पुऱ्या होणें जरूर आहे. या प्रदेशांना आवश्यक असलेलें आर्थिक विकासाचें कार्य खाजगी भांडवलदारांकडून होऊं शकेल असें वाटत नाहीं. परकीय खाजगी भांडवलाचें साहाय्य घेणेंहि त्यांना फारसें शक्य नाहीं. आर्थिक विकास बव्हंशीं अंतर्गत प्रयत्नांनींच होणें इष्ट आहे. पण त्याबरोबरच बाहेरून साहाय्यहि झालें पाहिजे. आणि अशा साहाय्याचा राजकीय व संरक्षक धोरणाशीं संबंध असतां कामा नये. त्याचप्रमाणें जेथें साम्यवादाचा धोका अधिक असेल तेथें अधिक साहाय्य केलें पाहिजे असेंहि समजण्याचें कारण नाहीं. हें साहाय्य आंतरराष्ट्रीय संघटनांच्या द्वारा झाल्यास त्याबाबतची कटकट बरीच कमी होण्याचा संभव आहे. स्थिर स्वरूपाच्या लोकशाही राजवटींत आर्थीक विकासाचें कार्य सुरळीतपणें व झपाट्यानें व्हावें या हेतूनेंच हें साहाय्य होणें इष्ट आहे. व त्या संबंधींच्या सर्व अटी, देखरेख इत्यादि या हेतूशीच संबद्ध असल्या पाहिजेत.

---

## मुसलमानांची समावेशन रीति.

मुसलमान समाज स्वेतर लोकांचें समावेशन करून घेण्यांत यूरोपीयन समाजाइतका चवचालपणा दाखवीत नाहीं. राजकीय, धार्मिक किंवा सामाजिक अशा समावेशनाच्या तीन पायऱ्याहि मुसलमान समाजाला माहीत नाहींत. एक धार्मिक समावेशन तेवढें त्याला माहीत आहे. मुसलमान देवधर्म कोणी स्वीकारिला म्हणजे तो इसम मुसलमान समाजांतील एकोन एक श्रेष्ठ व प्रेष्ठ हक्क भोगण्यास लायक होतो. त्याच्या आड कातडीचा रंग किंवा चेहऱ्याची ठेवण येऊं शकत नाहीं. वाटेल तो शुद्ध किंवा मिश्र वंश असो, हवी ती उच्च किंवा नीच संस्कृति असो, कोण्याहि इसमानें मुसलमानीं देवधर्म स्वीकारला कीं तो एकजात मुसलमान झाला. मुसलमान समाजांत समावेशन इतकें अगदीं पराकाष्ठेचें साधें व सरळ आहे.

— इतिहाससंशोधक वि. का. राजवाडे
( हिंदूसमाजांत हिंद्वितरांचा समावेश ]








प्रा. रा. द. गोडबोले

# अणुशक्ति-निर्मिती आणि विधायक कार्य

अणु, अणुकेंद्र-विज्ञान आणि अणुशक्ति या विषयांसंबंधीं लोकांमध्यें अलीकडे विशेष जिज्ञासा व उत्साह दिसून येतो; विशेषतः अणुशक्ति इतकी मुबलक आहे आणि तिचा विधायक कार्याकडे उपयोग करतां येणें साध्य आहे हें कळल्यापासून तर ही चौकसबुद्धि तीव्रतर झाली आहे. अणुशक्ती-विषयीं अद्यापि कांहीं गूढता, गुप्तपणा आहेच; आणि म्हणूनच अणुशक्तीला विधायक कार्याला जुंपण्याच्या आघाडीवर कोणते देश आहेत हें जाणून घेण्याचें औत्सुक्यहि वाढलें आहे. अशी विश्वासार्ह माहिती मिळावी म्हणून सात-आठ महिन्यांपूर्वी 'न्युक्लिऑनिक्स' या मासिकानें एक प्रयत्न केला. जागतिक मत अजमावण्याकरितां दोन प्रश्नांवर मतें मागविलीं होतीं, ते प्रश्न असे : ( १ ) आपणाला मान्य असलेल्या कोणत्याहि प्रमाणान्वयें किंवा मोजपद्दीनें अणुशक्तीच्या विधायक व हितकारक उपयोगांबाबत जागतिक पुढारी असें राष्ट्र कोणतें, आणि ( २ ) आपल्याला मान्य अशा कोणत्याहि प्रमाणान्वयें मुलकी ( बिनलष्करी ) अणुशक्ति-निर्मितीमध्यें आघाडीवरील प्रगतिमान राष्ट्र कोणतें ?

या प्रश्नांवर भर देण्याचें विशेष कारण म्हणजे गतवर्षी राजकारणी पुरुष व मुत्सद्दी यांनीं, विशेषतः अमेरिकेंत, या विषयावर दिलेला भर. हे प्रश्न चार निरनिराळ्या वर्गांतील लोकांकडे पाठवून मतें मागविलीं होतीं. ते वर्ग असे : (१) अणुशक्ति मंडळांतील अधिकारी, ( २ ) संपादक व लोकमत जागृत करणारे पुढारी, ( ३ ) अणुशक्तीच्या उद्योगांत गुंतलेले व ज्यांना अणुशक्तीच्या वापराचा अग्रहक्क आहे असे उद्योगपति, आणि ( ४ ) सामान्य जन. या मतमोजणीच्या निर्णयाप्रमाणें सारांशानें सांगावयाचें तर अमेरिका, ब्रिटन व रशिया यांना या अनुक्रमानें मतें मिळालीं. मतमोजणी ऑक्टोबर १९५६ मध्यें झाली, त्याचवेळीं काल्डरहॉल अणुशक्ति-केंद्राचा उद्‌घाटन समारंभ राणी एलिझाबेथ यांच्या हस्तें झाला होता. याचा परिणाम ब्रिटनला मिळणाऱ्या मतांवर बराच झाला असावा. वस्तुतः काल्डरहॉल येथील अणुभट्टी मुख्यतः प्लुटोनियम् या मूलद्रव्याच्या निर्मितीकरतां असून, शक्त्युत्पादन हा दुय्यम हेतु आहे.

हिंदुस्तानांतील एका संपादकानें असें मत प्रकट केलें कीं, "एकंदरींत कृतीपेक्षां बोलणेंच फार. मुलकी अणुशक्तिनिर्मिती व विधायक उपयोग याबाबत रशिया आघाडीवर दिसतो. औषधोपचार, दळणवळणाचीं साधनें, उद्योगधंदे यांच्याकरतां अणुशक्तीचा वापर कसा करतां येईल याकडे अमेरिकेनें लक्ष पुरवावें."

अमेरिकेच्या अणुशक्तिमंडळाच्या २१ व्या षाण्मासिक अहवालाप्रमाणें, १९५६ अखेर ( १ ) अमेरिकेनें अणुशक्तीविषयक कार्यांत ७ अब्ज डॉलर गुंतविले आहेत; ( २ ) एकूण ७४ अणुभट्ट्या तयार आहेत व १४० तयार होत आहेत; ( ३ ) एका वर्षांत युरेनियमची निर्मिती दुप्पट झाली; ( ४ ) सरकारी मदतीशिवाय खासगी अणुशक्ति-उत्पादनाच्या सात योजना चालू आहेत.

अणुशक्ति-उत्पादनाच्या भट्ट्या व कारखाने अमेरिकेमध्यें पश्चिमेकडील लॉस एँजल्स ते पूर्वेकडे ग्रॉटन ( कनेटिकट ) पर्यंत आणि दक्षिणेकडील



अनुक्रमणिका






लॉस् अलॅमॉस ( न्यू मेक्सिको ) ते उत्तरेकडे पोर्ट रेडियम ( कॅनडा ) पर्यंत पसरले आहेत. भट्टीची उष्णता वाढूं देऊन आंवाक्याबाहेर जाऊं दिल्यास काय होईल, त्यावर नियंत्रण कसें आणतां येईल हें पाहण्याकरितां आरको ( इडाहो ) येथें प्रयोग झाला. संशोधन, सुरक्षितता, संरक्षण व बचाव या चारहि दृष्टींनीं त्याचा उपयोग करून घेण्यांत आला.

अमेरिकेमध्यें अणुशक्ति वापरणाऱ्या जहाजाचा आराखडा तयार आहे. अणुशक्तीवर चालणारी पाणबुडी 'नॉटिलस' नवीन जळणाशिवाय ५०,००० मैल प्रवास करूं शकेल. सहा नवीन पाणबुड्यांची बांधणी चालू आहे. अणुशक्तीवर चालणारें विमानहि शक्य झालें आहे.

अनाकोंडा ( न्यू मेक्सिको ) येथील गिरणींत दररोज ३००० टन ( एकूण अमेरिकेंतील सुमारें तृतियांश ) युरेनिअम खनिज वापरलें जातें व सांठा सुमारें ५० लाख टन जवळच आहे. एलिअट लेक येथें १२ खाणी व जगांतील सर्वांत मोठी गिरणी आहे. १९६२ मध्यें येथें सुमारें ३०,००० लोक असतील.

रशियामध्यें १९५४ मध्येंच लहान अणुशक्ति-निर्मितीचा कारखाना तयार होता. आतां उष्णताजन्य अणुकेंद्रसंघटनक्रियेच्या उपयोगाची भाषा ते बोलूं लागले आहेत.

हिंदुस्तानांतहि ( २३ मार्चच्या बातमीप्रमाणें ) ईशान्य भागांत अणुशक्तिनिर्मितीसाठीं उपयोगी पडणारीं किरणोत्सर्गी खनिजें सांपडलीं आहेत. असा मोठा सांठा जगांत कोठें नसावा असा तर्क व्यक्त होत आहे. ३३ लक्ष टन खनिजांत ३ लक्ष टन थोरिअम व १० हजार टन युरेनिअम असावें. शिवाय एकूण ८०० लक्ष टन इल्मनाइट असावें. या साठ्यांत दुपटीनें वाढ होण्याची शक्यता आहे असा अंदाज आहे.

जिनीव्हा येथील अणुशक्तिवरील जागतिक परिषदेच्या अधिवेशनामध्यें ( १९५५ ) एतद्विषयक माहिती मुक्तपणें देण्याचा प्रथमच उपक्रम झाला. गुप्तता राखल्यानंतरहि शास्त्रज्ञांना मिळालेली माहिती सर्वसाधारणपणें सारखीच व सारख्याच पद्धतीनें मिळविली होती असें आढळून आलें. या उपक्रमानें 'अणुशक्ति-युगा'ची पहांट झाली असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं. यापुढेंहि या विषयांतील माहिती अधिकाधिक उपलब्ध होईल. अणुशक्तीकरितां लागणारीं द्रव्येंहि अपुरीं वा थोडीं आहेत असें नाहीं. युरेनिअम, थोरिअम यांचा शोध जगभर चालू आहे आणि नवीन नवीन मोठे सांठे सांपडत आहेत. या सर्व प्रकट होणाऱ्या माहितींतील सार समजून घेणें व त्यांतील सत्य अजमावणें सामान्य माणसाला सुबुद्धपणें साध्य होण्याकरितां कांहीं मूलभूत शास्त्रीय माहितीची आवश्यकता आहे. अशी माहिती प्रस्तुत लेखांत देण्याचा उद्देश आहे. अणुशक्तीच्या निर्मितीचा विचार प्रथम करूं. त्याकरितां सुरुवातीला पदार्थांच्या रचनेचें स्वरूप समजून घेणें योग्य ठरेल.

## पदार्थांची रचना : रेणु आणि अणु

पदार्थ रेणुमय असतात. रेणु ( molecule ) म्हणजे पदार्थाचे गुणधर्म असणारा लहानांत लहान कण. उदाहरणार्थ, मीठ पाण्यांत विरघळलें म्हणजे त्याचे लहानांत लहान कण पाण्यामध्यें सर्व ठिकाणीं पसरतात. हे दिसत नाहींत. कोणत्याहि बिंदूची चव खारट लागते, त्यावरून रेणूंचें अस्तित्व जाणवतें. पाणी तापवून वाफ केली असतां मीठ पुन्हा शिल्लक राहतें. त्याचप्रमाणें साखर, पाणी, लाकूड वगैरे सर्व पदार्थांचे रेणु असतात.

रेणूंचे आणखी भाग करतां येतात कीं नाहीं ? रेणु विभागतां येतात – पण रासायनिक क्रियांमध्यें. तांब्यावर सल्फ्युरिक ॲसिडची क्रिया झाली कीं त्यांतून मोरचुताचे रेणु तयार होतात. जस्तावर










हायड्रोक्लोरिक ॲसिडच्या परिणामानें झिंक क्लोराइडचे रेणु व हायड्रोजन वायूचे रेणु उत्पन्न होतात. रासायनिक क्रियेमध्यें भाग घेणारे कण हे अणु ( atom ) होत. रेणु हे अणूंचे संयुग असतात. अणूंचें विभाजन रासायनिक क्रियेनें करतां येत नाहीं. परंतु अणु स्वतंत्र न रहातां ते एकमेकांशीं संलग्न होऊन त्यांचे रेणु बनतात. उदाहरणार्थ, हायड्रोजन वायूच्या रेणूमध्यें दोन हायड्रोजन अणूंचा समावेश होतो; पाण्याच्या रेणूंत दोन हायड्रोजन अणु व एक ऑक्सिजन अणु संलग्न असतात. मीठामध्यें एक सोडिअमचा अणु व एक क्लोरिनचा अणु यांचा संयोग झालेला असतो. कांहीं रेणु अनेक अणूंचे बनलेले असतात. कांहींमध्यें एकच अणु असतो : उदाहरणार्थ, हेलिअम, निऑन, पारा यांचे रेणु.

पदार्थाचे गुणधर्म त्याच्या रेणूंमध्यें असलेल्या अणूंवर अवलंबून असतात; एवढेंच नव्हे तर रेणूमधील या अणूंच्या रचनेवरहि ते फार अवलंबून असतात. ही गोष्ट विशेषतः सेंद्रिय ( organic ) पदार्थांमध्यें फार आढळते. अगदीं साधें उदाहरण कार्बन या मूलद्रव्याचें. हें मूलद्रव्य कोळसा, शिसपेन्सिलीचें शिसें व हिरा या तीन जमीन-अस्मानाइतका फरक असलेल्या पदार्थांचें एकमेव घटक द्रव्य आहे. कौशल्य आहे रचनेंत सारें !

पदार्थांमध्यें जीं मूलद्रव्यें ( elements ) आढळतात त्यांचे लहानांत लहान घटक कण ते अणु. अशीं मूलद्रव्यें निसर्गांत ९२ आढळतात; म्हणजे अणूंचे प्रकार निसर्गामध्यें ९२ आढळतात. रासायनिक गुणधर्माप्रमाणें अणूंची कोष्टकांत मांडणी केल्यास त्यांचा क्रम साधारणपणें वजनाच्या चढत्या श्रेणीप्रमाणें लागतो. वजन याचा अर्थ पृथ्वीचें आकर्षण; त्याच्या ऐवजीं अणुमधील ' वस्तु ' ( matter ) प्रमाणें त्यांना ' वस्तुमान क्रमांक ' ( mass number ) देणें इष्ट ठरेल. अणुविज्ञानामध्यें ऑक्सिजन अणूचें वस्तुमान १६ धरणें सोईचें ठरलें आहे. याप्रमाणें वस्तुमानाचें एकधेय किंवा माप १·६६×१०<sup></sup>

सर्वांत हलका अणु हायड्रोजनचा; त्याचा 'अणुक्रमांक' ( atomic number ) एक. या प्रमाणें चढत्या श्रेणीनें शेवटचा क्रमांक ९२ हा युरेनियअम अणूचा लागतो कांहीं मूलद्रव्यांचे अणुक्रमांक व वस्तुमानक्रमांक पुढील कोष्टकांत दर्शविले आहेत.

| अणुक्रमांक | मूलद्रव्य | वस्तुमान क्रमांक |
|---|---|---|
| १ | हायड्रोजन | १, (२), (३). |
| २ | हेलिअम | ४, (३) |
| ३ | लिथिअम | ७, (६) |
| ४ | बेरिलिअम | ९. |
| ५ | बोरॉन | ११, (१०) |
| ६ | कार्बन | १२,(१३),(१४) |
| ७ | नायट्रोजन | १४, (१५) |
| ८ | ऑक्सिजन | १६, (१७),(१८) |
| २९ | तांबें | ६३, ६५ |
| ४७ | रुपें | १०७, १०९ |
| ७९ | सोनें | १९७, (१९८) |
| ८० | पारा | १९६, १९८ ते २०२,२०४ |
| ८२ | शिसें | २०४,२०६,२०८, |
| ८८ | रेडिअम | २२६, (२२३), (२२४) |
| ९२ | युरेनिअम | २३८, (२३५) |
| ९४ | प्लुटोनिअम | २३९, २४० |

वरील कोष्टकावरून दिसून येईल कीं एकाच गुणधर्माच्या अणूंचें वस्तुमान निरनिराळें असूं शकतें.

अशा अणूंना आपण 'तत्स्थानीय' ( isotope ) किंवा एकस्थानीय अणु म्हणूं. उदाहरणार्थ, निसर्गांत हायड्रोजनचे वस्तुमानक्रमांक १ व २ अणु आहेत. तिसरा तीन वस्तुमानक्रमांकाचा कृत्रिमरीत्या प्रयोगशाळेंत तयार करतां येतो. अशा तऱ्हेनें हायड्रोजन – १, हायड्रोजन – २ ( ड्यूटेरॉन ), हायड्रोजन – ३ (ट्रिटॉन) असे एकाच मूलद्रव्याचे तीन 'तत्स्थानीय' होत. नैसर्गिक युरेनिअममध्यें २३८ व २३५ वस्तुमानक्रमांकाचे तत्स्थानीय आढळतात. ऑक्सिजनचे १६,१७,१८ असे तीन तत्स्थानीय आहेत.

मूलद्रव्यें ८१ – थालिअम ते ९२ – युरेनिअम हीं 'किरणोत्सारी' ( radio-active ) आहेत. यांतून आल्फा, बीटा, गॅमा असे तीन प्रकारचे किरण बाहेर पडतात. या मूलद्रव्यांच्या अणूंचें आपोआप विघटन होऊन, एकाचें दुसऱ्यांत असें रूपांतर होत होत अंतीं शिसें या मूलद्रव्यांत रूपांतर होतें. या क्रियेलाच 'स्वयंस्फोटकत्व' म्हणतात. निसर्गांत ९२ च मूलद्रव्यें असलीं तरी प्रयोगशाळेंत त्याच्यापुढें आतां १०२ अणुक्रमांकापर्यंत मूलद्रव्यें तयार झालीं आहेत. त्यांतच ९४ क्रमांकाचें प्लुटोनिअम येतें. त्याचा अणुशक्तिनिर्मितीसाठीं मोठा उपयोग आहे.

## अणुरचना

पदार्थ रेणुमय आहेत; रेणु अणुमय आहेत. रासायनिक क्रियेमध्यें अणूंचें विभाजन होत नाहीं. अन्य प्रयोगांतीं अणुरचनेचें ज्ञान शास्त्रज्ञांना झालें आहे. अणूंचा व्यास $२\times१०^{-८}$ सेंटिमिटर या प्रतीचा असतो. दोन मैल व्यासाच्या वर्तुळाच्या क्षेत्राचें, एक फूट व्यासाच्या वर्तुळाच्या क्षेत्राशीं जें प्रमाण असतें तेंच नया पैशाचा व्यास व अणूचा व्यास यांचें मानावयास हरकत नाहीं. अणु म्हणजे एक मोठी पोकळीच असते. त्याचें सर्व वस्तुमान मुख्यतः केंद्रस्थानीं सामावलेलें असतें. या अणुकेंद्राचा व्यास $१०^{-१२}$ सेंटिमिटर या प्रतीचा म्हणजे अणुव्यासाच्या १/१०,००० अंश इतकाच असतो. या अणुकेंद्राभोंवतीं ऋणविद्युद्धारित कण, सूर्याभोंवतीं ग्रह त्याप्रमाणें, फिरत असतात. हे ऋणविद्युत्कण एकाच गुणधर्मांचे सर्व अणूंमध्यें आढळतात. त्यांना प्रथम जॉन्स्टन स्टोनी यांनी 'इलेक्ट्रॉन' ही संज्ञा सुचविली. त्यांना आपण 'बीजक' म्हणूं. विजेच्या दिव्याच्या तारेंतील वीजेचा प्रवाह म्हणजे बीजकांचाच प्रवाह होय. किरणोत्सारी द्रव्यांतून निघणारे बीटा कण, उष्णताजन्य बीजकण, प्रकाशजन्य बीजकण हे सर्व बीजकच होत. कोणताहि विद्युद्भार हा बीजकाच्या विद्युद्भाराच्या पूर्णांक पटीनेंच वाढतो वा कमी होतो.

अणूंवर स्थिर सामान्य स्थितींत विद्युद्भार नसतो. म्हणून केंद्रस्थानीं केंद्राबाहेरील बीजकांच्या इतकाच धनभार असला पाहिजे. प्रयोगांतीं अणुमध्यें त्याच्या अणुक्रमांकाइतके बीजक असतात असें दिसून आलें आहे. म्हणून अणुकेंद्रस्थानीं अणुक्रमांक 'ज्ञ' इतका धनभार असला पाहिजे. अणुकेंद्रीय विद्युद्भारावरूनच अणूचे रासायनिक गुणधर्म ठरतात. सभोंवतालचे बीजक हे निरनिराळया शक्तिसंचयदर्शक पातळयांमध्यें आहेत असें मानतात. बीजक वरच्या पातळींतून खालच्या पातळींत सरकला म्हणजे शक्तिसंचयांतील जो फरक तो प्रकाशपुंजरूपानें प्रकट होतो.

अणूंतील बीजक पूर्णपणें अपसृत झाला म्हणजे त्याचें 'आयनीभवन' ( ionization ) झालें असें म्हणतात. नुसतें वरच्या पातळींत स्थानांतर झालें तर अणु 'क्षुब्ध' ( excited ) झाला असें म्हणतात. ही क्षुब्ध स्थिति फार वेळ टिकत नाहीं आणि बीजक पूर्वस्थळीं आला म्हणजे प्रकाश उत्पन्न होतो. उष्णता किंवा विद्युत्सर्ग यांचेमुळें अणु प्रक्षुब्ध होतो व याच कारणामुळें प्रकाश उत्पन्न होतो.

## अणुकेंद्ररचना

अणुकेंद्रस्थानीं दोन प्रकारचे कण असतात, ( १ ) प्रोटॉन व ( २ ) न्यूट्रॉन. प्रोटॉन म्हणजे हायड्रोजनचें अणुकेंद्र. त्यावर बीजकाच्या इतका धन विद्युद्भार आणि जवळजवळ ‘ अणुवस्तुमान मापा’-इतकें वस्तुमान असतें. (१·६७३ × १०$^{-२४}$ ग्रॅम). बीजकाचें वस्तुमान प्रोटॉनच्या वस्तुमानाच्या १/१८३६ अंश इतकें लहान आहे. न्यूट्रॉन या कणाचें वस्तुमान सुमारें प्रोटॉनइतकें ( १·६७६ × १०$^{-२४}$ ग्रॅम ) असतें परंतु त्यावर विद्युद्भार मुळींच नसतो. न्यूट्रॉनचा शोध चॅडविकनें १९३२ मध्यें लावला. न्यूट्रॉन-प्रोटॉन उपपत्तीप्रमाणें अणुकेंद्रामध्यें अणुक्रमांक ‘ ज्ञ ’ इतके प्रोटॉन धरले म्हणजे त्याच्या बीजेच्या भाराची संगती लागते आणि वस्तुमानाची भर होण्याकरितां त्यामध्यें ( वस्तुमान-क्रमांक – अणुक्रमांक ) इतके न्यूट्रॉन मानावे. याप्रमाणें हायड्रोजनमध्यें केंद्रस्थानीं १ प्रोटॉन व ० न्यूट्रॉन, हेलियममध्यें २ प्रोटॉन व २ न्यूट्रॉन, तांब्यांत २९ प्रोटॉन व ३६ न्यूट्रॉन, सुवर्णामध्यें ७९ प्रोटॉन व ११८ न्यूट्रॉन, युरेनिअममध्यें ९२ प्रोटॉन व १४६ न्यूट्रॉन अशा प्रकारें वाटणी होईल.

याप्रमाणें केंद्रस्थानीं न्यूट्रॉन व प्रोटॉन आणि केंद्राबाहेर ( अणुक्रमांकाइतके ) इलेक्ट्रॉन हीं सर्व अणूंचीं सामान्य बीजें होत. किरणोत्सारी द्रव्यांतून निघणारा आल्फा कण हा हेलिअमचें अणुकेंद्रच होय; त्यावर २ बीजकांचा धन विद्युद्भार असतो व वस्तुमान ४ असतें. ‘ तत्स्थानीय ’ अणूंमध्यें तितकेंच प्रोटॉन पण निरनिराळे न्यूट्रॉन असतात. कोणताहि ‘ क्ष ’ अणु $ज्ञ^{अ}$ या चिन्हानें दर्शवितां येईल. उदाहरणार्थ :

$_{१}हा^{१}$, $_{२}हे^{४}$, $_{३}लि^{७}$, $_{४}बे^{९}$, $_{८}ऑ^{१६}$, $_{९२}यु^{२३८}$ या संज्ञा हायड्रोजन, हेलिअम, लिथिअम, बेरीलिअम, ऑक्सिजन, आणि युरेनिअम निदर्शक असून वरच्या बाजूचे अंक वस्तुमान दर्शवितात व खालच्या बाजूस लिहिलेले अनुक्रमांक होत.

किरणोत्सारी द्रव्यांतून निघणारे बीटा कण हे बीजकच असले तरी अणुकेंद्रस्थानीं बीजक मानण्यांत फार अडचणी आहेत. या क्रियेमध्येंच त्यांची उत्पत्ति होतें. बीटा-स्वयंस्फोटकत्वाच्या क्रियेमध्यें न्यूट्रॉनचें प्रोटॉनमध्यें रूपांतर होत असतें, त्यावेळींच बीजक निर्माण होऊन बाहेर पडतो.

## अणूंचें स्थैर्य

अणूंमधील रासायनिक आकर्षणामुळें रेणु स्थिर रहातात. अणुविषयक क्रिया प्रतिक्रियांतील शक्ति ‘ इलेक्ट्रॉन-व्होल्ट ’ या मापानें मोजणें सोईस्कर होतें. एक इलेक्ट्रॉन-व्होल्ट म्हणजे एक व्होल्ट दाबानें इलेक्ट्रॉनमध्यें ( बीजकामध्यें ) उत्पन्न होणारी गतिजन्य शक्ति. रासायनिक क्रियांतील वा आकर्षणाची शक्ति कांहीं इलेक्ट्रॉन-व्होल्ट असते.

कोणत्या आकर्षणामुळें केंद्रस्थानी न्यूट्रॉन व प्रोटॉन एकत्र राहूं शकतात ? वैजिक (electric) वा गुरुत्वाकर्षण यांचा परिणाम फारच अल्प आहे. प्रोटॉन आणि प्रोटॉन मध्यें तर अपकर्षण असेल. केंद्रीय कण एकत्र ठेवणाऱ्या बंधनाला आपण केंद्रीय आकर्षण ( nuclear forces ) म्हणूं. केंद्रीय आकर्षण शक्ति दशलक्ष इलेक्ट्रॉन-व्होल्ट (Mev) मध्यें मोजावी लागते. त्याला आपण ‘ एम् . इ. व्ही ’ ही संज्ञा देऊं. १ अणुवस्तुमानमाप = ९३१ एम् इ व्ही.

आइन्स्टाइनच्या सापेक्षवादामध्यें जीं अनेक विधानें सिद्ध झालीं त्यांत शक्ति आणि वस्तुमान यांचा संबंध दर्शविणारें श = व × सी$^{२}$ हें एक आहे. ‘ श ’ म्हणजे शक्ति, ‘ व ’ म्हणजे वस्तुमान, आणि ‘सी’ म्हणजे प्रकाशाचा वेग. शक्ति व वस्तुमान एकरूप असून एकाचें दुसऱ्यांत रूपांतर










होऊं शकतें असा या विधानाचा अर्थ होतो. उदाहरणार्थ, ' व ' वस्तुमान नष्ट झाल्यास, ( $\text{व} \times \text{सी}^{2}$ ) इतकी शक्ति निर्माण होईल व ती किरणरूप असेल तर त्याची क्षिप्रता ( प्रतिसेकंदास आंदोलन संख्या ) $h\text{v} = (\text{व} \times \text{सी}^{2})$ या विधानानें सिद्ध होईल ( $h$ = प्लॅंकचा स्थिरांक, $\text{v}$ = क्षिप्रता ).

अणूंचें वस्तुमान सूक्ष्मरीत्या वस्तुमान-पटसंबंधींच्या मोजणीवरून उपलब्ध झालें आहे. ऑक्सिजनचें वस्तुमान १६ धरल्यास हीं वस्तुमानें बरोबर पूर्णांकांत येत नाहींत. हेलिअम या अत्यंत स्थिर अणूचें उदाहरण घेऊं. यामध्यें २ प्रोटॉन व २ न्यूट्रॉन कोणत्या बंधनामुळें स्थिर रहातात ? या चार कणांचें वस्तुमान हेलिअम अणुकेंद्र वस्तुमानापेक्षां जास्त भरतें, कसें तें पहा :

| | ( अणुवस्तुमान माप ) |
|---|---|
| २ न्यूट्रॉन + २ प्रोटान = | ४·०३३१५० |
| हेलिअम अणुकेंद्र = | ४·००२७७५ |
| फरक = | ०·०३०३७५ |
| = | २८·३ एम्.ई.व्ही –( शक्ति ) |

आइन्स्टाइनच्या वस्तुमान-शक्ति एकरूपतेच्या सिद्धांताप्रमाणें, अणुकेंद्राचें वस्तुमान, त्यांतील कणांच्या वस्तुमानांच्या बेरजेपेक्षां कमी असलें पाहिजे आणि हा फरक केंद्रीय " बंधन-शक्ति " दर्शवितो. उदाहरणार्थ, हेलिअम अणुकेंद्रामध्यें दर कणागणिक सुमारें ७ एम्.इ.व्ही बंधनशक्ति आहे. हे चार कण वेगळे करावयाचे झाल्यास एवढी शक्ति पुरवावी लागेल. स्थिर अणूंतील दर कणागणिक बंधन शक्ति ७ ते ८ एम्.इ.व्ही असते. हलक्या अणूंमध्यें ती १·१ पासून कमीजास्ती होते. हेलिअम, कार्बन, ऑक्सिजन मध्यें ती विशेष जास्त आहे. जास्तींत जास्त अणुक्रमांक ५० च्या आसपास असून त्यानंतर कमी होत जाऊन युरेनिअममध्यें ७·६ एम्.इ.व्ही इतकीच आहे.

**हायड्रोजन अणुकेंद्रें म्हणजे प्रोटॉन आणि न्यूट्रॉन जर एकत्रित आणतां येऊन त्यापासून हेलिअम ( वा कार्बन किंवा ऑक्सिजन ) सारखीं विशेष स्थिर मूलद्रव्यें निर्माण करतां आलीं तर फार मोठी शक्ति बाहेर पडेल व अशा रीतीनें अणुशक्ति-उत्पादन होईल ( ही अणुशक्तिनिर्मितीची ' घटन'क्रिया ). उलट युरेनिअमसारखे जड अणु फुटून मध्यम अणु उत्पन्न झाले तरीहि शक्ति निर्माण होईल. ( ही अणुशक्तिनिर्मितीची ' विदलन ' क्रिया. )**

**अणु-विघटन**

किरणोत्सारी द्रव्यामध्यें नैसर्गिक रीत्या अस्थैर्यामुळें अणुविघटन होऊन त्याचें नवीन अणुमध्यें रूपांतर होतें. प्रयोगशाळेमध्यें गतिमान प्रोटान, डयूटेरॉन, आल्फा कण, न्यूट्रॉन यांचा अणुकेंद्रावर भडिमार केला असतां अणुविघटन करतां येतें. उदाहरणार्थ :

$${}_{1}\text{हा}^{1} + {}_{3}\text{लि}^{7} + \text{प्रोटॉनचीशक्ति} = ({}_{4}\text{बे}^{8})$$

प्रोटान  लिथिअम  संयुक्तअणु

$$= {}_{2}\text{हे}^{4} + {}_{2}\text{हे}^{4} + \text{कणांची शक्ति}$$

हेलिअम  हेलिअम

कांहीं विघटनक्रियेमध्यें शक्ति पुरवावी लागते; कांहींत अधिक निर्माण होते.

न्यूट्रॉनवर विद्युद्भार नसल्यामुळें, त्याच्या भडिमारानें कोणत्याहि अणूचें किरणोत्सारी द्रव्यांत रूपांतर करणें सहज साध्य होतें. नैसर्गिक युरेनिअम मध्यें यु – २३५ व यु – २३८ हीं द्रव्यें १ : १४० या प्रमाणांत असतात. यु – २३८ वरील न्यूट्रॉन भडिमाराचा परिणाम असा होतो:–

$${}_{0}\text{न्यू}^{1} + {}_{९२}\text{यु}^{२३८} \rightarrow {}_{९२}\text{यु}^{२३९} \rightarrow {}_{९३}\text{नेप्चुनिअम}^{२३९} + \text{बीटाकण}$$

$${}_{९३}\text{नेप्चुनिअम}^{२३९} \rightarrow {}_{९४}\text{प्लुटोनिअम}^{२३९} + \text{बीटाकण}$$

प्लुटोनिअम हें किरणोत्सारी द्रव्य असून त्याचें ' अर्धायुष्य ' २४,४०० वर्षें आहे. कोणत्याहि










किरणोत्सारी द्रव्याला ' अर्धायुष्य ' असतें. याचा अर्थ अर्ध्याचें आयुष्य असा घेतला पाहिजे. म्हणजे ' अर्धायुष्या 'च्या कालांत मूळ सांठ्यांतील अर्ध्या-सांठ्याचें नवीन मूलद्रव्यांत रूपांतर होतें व अर्धा सांठा तसाच शिल्लक रहातो. उदाहरणार्थ, $_{८३}$बिस्मथ$^{२१०}$ चें अर्धायुष्य ५ दिवस आहे. सुरवातीला १ ग्रॅम हें द्रव्य असेल तर पांच दिवसांनीं १/२ ग्रॅम शिल्लक राहील, आणखी पांच दिवसांनीं १/४ ग्रॅम शिल्लक राहील. प्लुटोनिअम हें कृत्रिक आल्फा किरणोत्सारी द्रव्य आहे. पण एकदां निर्माण झाल्यास तो सांठा आपणास कितीतरी वर्षे वापरतां येईल; सांठा अर्धा होण्यास २४००० च्या वर वर्षे जातील.

## अणु-विदलन क्रिया

अतिमंद न्यूट्रॉनचा भडिमार युरेनिअम – २३५ वर झाला असतां एक स्फोटक अणु-विघटन क्रिया घडते. यामध्यें साधारणतः सारख्याच वस्तुमानाचीं दोन शकलें होऊन शिवाय २ किंवा ३ वेगवान न्यूट्रॉन बाहेर पडतात. म्हणून या क्रियेला ' विदलन ' ( fission ) क्रिया म्हणूं. याचा प्रथम शोध रासायनिक पद्धतीनें ओटो हान व स्ट्रासमन यांनीं १९३९ मध्यें लावला. दोन गति-मान खंड, न्यूट्रॉन आणि किरणोत्सारी खंडांतून निघणारे किरण या सर्वांची शक्ति जमेस धरतां, प्रत्येक विदलन-क्रियेमध्यें सुमारें २०० एमूईव्ही इतकी शक्ति निर्माण होते. ही क्रिया खालीं दिल्या-प्रमाणें लिहितां येईल:——



$$_{०}\text{न्यू}^{१} + _{९२}\text{यु}^{२३५} \rightarrow _{९२}\text{यु}^{२३६} \rightarrow _{५६}\text{वेरिअम}^{१४०} \text{ (किरणोत्सारी)} + _{३६}\text{क्रिप्टॉन}^{९४} \text{ (,,)} + \text{२ न्यूट्रॉन}$$

प्रत्येक वेळीं वेरिअम व क्रिप्टॉन हींच शकलें निर्माण होतात असें नाहीं; इतर पुष्कळ अणु साधारण समान वस्तुमानाचे, एक हलका, एक जड अशा जोड्या उत्पन्न होतात.

अतिमंद म्हणजे ज्यांची शक्ति १।४० इलेक्ट्रॉन व्होल्ट आहे अशा न्यूट्रॉनचा ( गती सुमारें तासीं ५००० मैल ) या कामीं उपयोग होतो. युरेनिअम – २३८ चें विदलन अतिमंद न्यूट्रॉननीं होत नाहीं, परंतु वेगवान् न्यूट्रॉननीं होतें.

## विदलन क्रियांचें चक्र : अणुशक्तीची निर्मिति

अणुशक्ति-निर्मितीची शक्यता अशा विदलन क्रियांचें चक्र निर्माण करण्यामध्यें आहे. प्रत्येक विदलन क्रियेमध्यें उत्पन्न होणाऱ्या वेगवान् न्यूट्रॉनना अतिमंद करतां आलें व त्यांतील एकतरी पुन्हां विदलन करूं शकला तर या क्रियेचें चक्र सुरू होईल व सतत शक्ति निर्माण होईल. हें न साधलें तर ओल्या पाचोळयाला लावलेली आग ज्याप्रमाणें न पसरतां स्थानिकच राहते त्याप्रमाणें कांहीं विदलनें होतील पण आपणाला हवी असलेली शक्ति निर्माण होणार नाहीं. शक्ति निर्मितीची शक्यता खालील प्रश्नांवर अवलंबून आहे.

( १ ) युरेनिअम – २३५ पुरेशाप्रमाणांत वेगळें काढणें; ( २ ) उत्पन्न होणाऱ्या न्यूट्रॉनची गति मंद करणें आणि ते बाहेर जाणार नाहींत किंवा शोषले जाणार नाहींत याची शक्यता निर्माण करणें; ( ३ ) उत्पन्न होणाऱ्या शक्तीवर ताबा मिळविणें; ( ४ ) उत्पन्न होणारी किरणोत्सारी द्रव्यरूपी राख काढून टाकणें व नवीन जळण घालणें; ( ५ ) उत्पन्न होणारी उष्णता सोईस्कररीत्या बाहेर वापरण्याची व्यवस्था करणें.

विदलन क्रियांचें चक्र निर्माण करण्यांत प्रथम २ डिसेंबर १९४२ या दिवशीं प्रोफेसर फर्मी यांनीं यश मिळविलें. हें चक्र निर्माण होण्याकरितां युरेनि-अम – २३५ चें कांहीं ठराविक वस्तुमान एकत्र आणणें आवश्यक असतें. न्यूट्रॉन मंद करण्याकरितां पाणी, जड पाणी ( ड्यूटेरॉन असलेलें ), बेरीलिअम, ग्राफाइट हे पदार्थ उपयोगी पडतात. यांना गति नेमस्त करणारे पदार्थ

म्हणू. युरेनिअम – २३८ चा उपयोग वेगवान न्यूट्रॉनच्या योगानें विदलन साधून आणखी न्यूट्रॉन निर्माण करण्यांत होतो. अशा रीतीनें 'अणु भट्टी'चें (reactor) स्वरूप निरनिराळे दांडे आणि पदार्थ यांची एकतऱ्हेची रास (pile) करण्यांत होतें. एका प्रकारच्या अणुभट्टींत पाण्याच्या तलावाचा न्यूट्रॉन मंद करून समतोल राखण्याकडे उपयोग करतात आणि कॅडमिअम धातूच्या दांड्यांचा त्यांच्या शोषक गुणधर्मामुळें न्यूट्रॉनवर नियंत्रण आणण्याकरितां उपयोग करतात. अशा तऱ्हेची 'अप्सरा' नांवाची अणुभट्टी ट्रॉम्बे येथें संशोधन-कार्यासाठीं तयार केली आहे.

अणुशक्तिनिर्मितीची शक्यता नवीन जळण निर्माण करण्यांत आहे. असें नवीन जळण युरेनिअम – २३८ पासून न्यूट्रॉनच्या भडिमारानें प्लुटोनिअम – २३९ रूपानें निर्माण होतें. त्याच-प्रमाणें थोरिअम पासून युरेनिअम – २३३ निर्माण करतां येतें. हीं दोन्ही मूलद्रव्यें अति मंद न्यूट्रॉनच्या भडिमारानें विदलित होऊन त्यांच्यापासून शक्ति निर्माण होते. एक वर्षभर ५० युनिट (किलोवॅट – अवर) शक्ति पुरविण्याकरतां दोन तोळयांच्या आंत युरेनिअम – २३५ लागेल; परंतु देशाची गरज वार्षिक एक कोटी युनिट असेल तर प्रतिवर्षी १६ टन शुद्ध युरेनिअम – २३५ किंवा २२०० टन नैसर्गिक युरेनिअम लागेल.

## अणुशक्तीचें विधायक कार्य

अणुशक्ति प्रथम उष्णतेच्या रूपानें उत्पन्न होते. अणुभट्टीच्या बाहेर ही उष्णता यशस्वी रीतीनें आणल्यानंतर ती उष्णता म्हणून किंवा तिचें विजेंत रूपांतर करून वापरतां येईल. एकदां अशा रीतीनें वस्तुमानाचें शक्तींत रूपांतर करतां येतें याचें ज्ञान उपलब्ध झालें कीं अणुशक्तीचा सांठा हा मानवी गरजांच्या दृष्टीनें अनंत समजण्यास हरकत नाहीं.

अणुशक्तीच्या उपयोगानें सर्व तऱ्हेचीं वाहनें म्हणजे आगगाड्या, जहाजें, विमानें वगैरे चालवितां येतील. अणुशक्तीवर चालणाऱ्या पाणबुड्या व विमान अस्तित्वांत आहेत; आगगाडीचाहि आराखडा तयार आहेच.

अणुभट्टीचा उपयोग (१) शक्ति-निर्मिती-करितां, (२) संशोधनाकरितां, आणि (३) नवीन जळण निर्माण करण्याकरितां होतो. शिवाय किरणोत्सारी द्रव्यें सहज साध्य होतात. संशोधनामध्यें विशेषत: पदार्थांचे गुणधर्म न्यूट्रॉन भडिमारामुळें कसे बदलतात; नवीन योग्य गुणधर्मांचीं द्रव्यें व धातू निर्माण करण्याकडेहि होतो. शिवाय न्यूट्रॉन-विषयक पदार्थ-विज्ञानशास्त्रांतील किंवा प्राणिशास्त्रांतील प्रश्नांचें संशोधन करतां येतें. निरनिराळया किरणांचा प्राण्यांवर व मनुष्यांवर काय परिणाम होतो, संरक्षणाच्या दृष्टीनें काय तजवीज करायला पाहिजे हें पहातां येतें. जीवपेशींवर किरणांचा काय परिणाम होतो याचा अभ्यास करतां येईल.

अणुभट्टींतील न्यूट्रॉनच्या भडिमारानें कोणत्याहि द्रव्याचें किरणोत्सारी मूल द्रव्यांत रूपांतर करणें सहज साध्य आहे. या दृष्टीनें कृत्रिम आयोडिन, बेरिअम, स्ट्रॉंशम, कॅल्शम, झिरकोनिअम, कोबल्ट, लोखंड, फॉस्फरस, सोडिअम, सल्फर वगैरे किरणोत्सारी द्रव्यांचा उपयोग होतो.

आयोडिन, सोडिअम, फॉस्फरस, सल्फर, कॅल्शम वगैरेंचा प्राणिशास्त्रीय संशोधनाकरितां, रोगांच्या अभ्यासाकरितां व त्यांचें निर्मूलन करण्याकडे उपयोग होतो. पदार्थ निर्जंतुक करण्याकडे बीटा आणि गॅमा किरणांचा उपयोग होतो. याप्रमाणें फळें, अंडीं, दूध वगैरे न नासतां टिकवितां येतात. किरणांच्या योगानें स्वयं छायाचित्र घेतां येऊन अंतर्गत दोष किंवा अंतर्भागाची माहिती मिळूं शकते. किरणोत्सारी द्रव्यांच्या तेजोस्फुरण गुणधर्माचा स्फुरित प्रकाश उत्पन्न करण्याकडे उपयोग करतां येईल. किरणोत्सारी द्रव्यें कागदाचे कारखाने, गिरण्या वगैरे ठिकाणीं स्थिर विद्युद्भाराचा त्रास नाहींसा












करतात. आयनीकरणामुळें वीज सांठणें अशक्य होतें.

अत्यल्प किंवा लेशमात्र किरणोत्सारी द्रव्य वापरण्याच्या तंत्राचा उपयोग पदार्थविज्ञान, रसायन आणि जीवशास्त्र यांतील संशोधनासाठीं करतां येतो. रक्तांतील लोहयुक्त द्रव्य म्हणजे 'हेमिन', त्याचा 'ग्लोबिन्' या नत्रयुक्त द्रव्याशीं संयोग होऊन 'हीमोग्लोबीन' होतें. यांतूनच रक्ताला ऑक्सिजनचा पुरवठा होतो. किरणोत्सारी लेशमात्र लोहाचा रक्तांत समावेश करून या सर्व क्रिया कसकशा होतात व अभिसरण कसें होतें याचा तपशीलवार अभ्यास करतां येतो. त्याचप्रमाणें लेशमात्र किरणोत्सारी नायट्रोजन-१५ उपयोग करून रक्तांतील तांबड्या पेशींचें आयुष्य १३० दिवसपर्यंत असतें असें आढळून आलें आहे. पेशींमध्यें पोषकद्रव्य-निर्मितीचें कार्य किंवा जीवनरसाचें पृथःकरण यामध्यें एखाद्या रेणूचें काय कार्य आहे हें अत्यल्प किरणोत्सारी तत्स्थानीयाच्या साहाय्यानें साधतां येतें. किरणोत्सारी तत्स्थानीय सोडिअम, क्लोरिन, फॉस्फरस, कार्बन-१४, कॅल्शम वगैरेंचा अशा कार्यांत उपयोग होतो.

किरणोत्सारीं द्रव्यें मुळांत 'आयनीकरणा'च्या गुणधर्मामुळें विनाशक; परंतु रोगट भागांतील पेशी अशा किरणांच्या भडिमारानें मरतात, त्याबरोबर कांहीं निरोगी पेशीहि मरतात. हा भाग नंतर काढला जातो किंवा अशा पेशींचा उत्सर्ग होऊन नवीन निरोगी पेशी तयार होतात. अशा रीतीनें पुन्हा पुन्हा प्रमाणशीर किरण देऊन कॅन्सरसारखे रोग आटोक्यांत ठेवतां येतात किंवा बाह्य भागीं असल्यास बरेहि होतात.

किरणोत्सर्गाचा जीवाणूवर काय परिणाम होतो व त्यांतील बदलामुळें प्रजाजननावर काय परिणाम होईल याचाहि अभ्यास करणें आतां शक्य झालें आहे

अणुभट्टीच्या योगानें अशीं उपयुक्त किरणोत्सारी द्रव्यें विपुल प्रमाणांत मिळणें सुलभ झालें आहे.

### उष्णताजन्य अणुकेंद्रप्रक्रिया

तपमान दशलक्ष सेंटिग्रेडच्या मानानें असेल तर अणुकेंद्र घटन, विघटन क्रिया आपोआप होतात. विशेषतः खालीं दिलेल्या संघटन क्रियांना महत्त्व आलें आहे.

${}_{१}$(ट्रिटॉन)${}^{३}$ + ${}_{१}$(ड्यूटेरॉन)${}^{२}$ -> ${}_{२}$(हेलियम)${}^{४}$ + ${}_{०}$(न्यूट्रॉन)${}^{१}$ + ${}_{१७}$ एम् ई व्ही शक्ति (ट्रिटॉन) + ट्रिटॉन -> हेलिअम + २ न्यूट्रॉन + ११ एमूईव्ही. या दोन क्रिया दशलक्षांश सेकंदाच्या अवधींत होऊं शकतात. अशा तऱ्हेच्या क्रिया सूर्यामध्यें आणि इतर ताऱ्यांमध्यें होत असाव्यात व त्यामुळें शक्ति निर्माण होऊन त्याचें प्रारण होत असावें असा तर्क आहे.

हायड्रोजन गोलामध्यें लिथिअम-६ व ड्यूटेरॉन यांचा संयुग वापरतात. त्यावर न्यूट्रॉन व ड्यूटेरॉनचा भडिमार झाल्यास खालील क्रिया होतातः—

${}_{३}$लिथिअम${}^{६}$ + ${}_{०}$न्यू${}^{१}$ -> ${}_{२}$हे${}^{४}$ + ${}_{१}$ट्रिटॉन${}^{३}$

${}_{१}$ट्रिटॉन${}^{३}$ + ${}_{१}$ड्यूटेरॉन${}^{२}$ -> ${}_{२}$हे${}^{४}$ + ${}_{०}$न्यू${}^{१}$ + १७ एमूईव्ही शक्ति. याप्रमाणें क्रियांचें चक्र चालू राहून दर अणुवस्तुमान मापामागें सुमारें ३ एमूईव्ही इतकी शक्ति निर्माण होते.

पुरेसें तपमान आणि न्यूट्रॉन उत्पन्न होण्याकरतां हायड्रोजन गोलाच्या गर्भामध्यें अणुगोल वापरावा लागतो. अणुगोलामध्यें युरेनिअम-२३५ किंवा प्लुटोनिअम भरपूर प्रमाणांत एकत्र आल्यानें विदलन-क्रियांचें चक्र निर्माण होऊन भडका उडतो. त्यामुळें पुरेसें उच्च तपमान उत्पन्न होतें आणि न्यूट्रॉनहि भरपूर प्रमाणांत बाहेर पडतात.

हायड्रोजन गोलासाठीं वस्तुमानाची मर्यादा नाहीं किंवा संघटन क्रियांमुळें किरणोत्सारी द्रव्यांची 'राख'हि निर्माण होत नाहीं. प्रश्न असा आहे कीं,








ही शक्ति नियंत्रित करून तिचा विधायक हितकारक कार्यासाठीं उपयोग करतां येईल का नाहीं ?

### समारोप

सर्व पुढारलेलीं राष्ट्रें आजकाल अणुशक्तीचा विधायक उपयोग कसा करतां येईल याकडे लक्ष पुरवीत आहेत. अणुशक्तिनिर्मितीसाठीं कॅनडाच्या साहाय्यानें ट्रॉम्बे ( मुंबई ) येथें एक मोठी अणुभट्टी बांधीत आहेत. त्याकरितां कॅनडा १ कोटी डॉलर खर्च करणार आहे. अशा आणखी भट्टयाहि हिंदुस्तानांत पुढील ४।५ वर्षांत तयार होणार आहेत.

उष्णताजन्य संघटन-क्रियामध्यें उत्पन्न होणारी शक्ती नियंत्रित कशी करावी याचें संशोधन करण्यासाठीं अमेरिकेमध्यें सध्यां जोराचे प्रयत्न चालू आहेत. त्याकरतां Starator (star-generator) नांवाची संशोधनशाखाच त्यांनी चालू केली आहे.

आशिया खंडाच्या उपयोगासाठीं मॅनिला येथें अमेरिकेच्या साहाय्यानें एक योजना आखण्यांत आली आहे. त्याकरितां सुमारें ५०००० किलोग्रॅम किंवा ५ टन शुद्ध युरेनिअम - २३५ पुरविण्याचें अमेरिकेनें ठरविलें आहे.

प्रगत राष्ट्रांच्या बरोबरीनें रहावयाचें तर अणुशक्ति-निर्मितीच्या कार्यांत यशस्वी रीतीनें भाग घेणें आवश्यक आहे. त्याकरितां अनेक शास्त्रज्ञ अणुविज्ञान, गणित यांत वाकबगार असे आणि अनेक कलातंत्रज्ञ येत्या १० वर्षांत तयार व्हावे लागतील. असें शिक्षण देण्याचा उपक्रम हिंदी अणुशक्ति मंडळानें सुरू केला आहे.

अणुशक्तीची आतां कोठें पहांट होत आहे– नुकतेंच झुंजुमुंजू झालें आहे. लौकरच अरुणोदय होऊन सूर्योदय होण्यास फारसा अवधि नाहीं. अशा समयीं आपल्यांतील उत्तमोत्तम, हुषार, महत्त्वाकांक्षी तरुणांनीं अशा शिक्षणासाठीं पुढें यावयास पाहिजे; त्याशिवाय स्वदेशांतील उन्नतीमध्यें प्रतिष्ठेनें भाग घेतां येणार नाहीं.

---

## हिंदूंची समावेशन पद्धति

अखिल मानववंशांशीं ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें समबुद्धीनें वागावें, ही आर्यांची पुरातन कालापासून पहिली नीति आहे. आपण गांठलेल्या संस्कृतीस गांठण्याच्या मार्गाला लावून द्यावयाचें, ही आर्यांची दुसरी नीति आहे. जवळ आलेल्या कोणत्याहि समाजाचा वंश, रूप, रंग, इत्यादि सबबीवर, द्रोह करावयाचा नाहीं, त्याला हिंस्रबुद्धीनें ठार करावयाचें नाहीं, व त्याला दास बनवावयाचें नाहीं, ही आर्यांची तिसरी नीति आहे. आणि शेजारास आलेल्या समाजापासून आपली बीजक्षेत्रशुद्धि भ्रष्ट होऊन, आपला वंश, रूप व वर्ण ह्यांच्यांत वैगुण्य येऊं द्यावयाचें नाहीं, ही आर्यांची चवथी नीति आहे. ह्या चतुष्पथ नीतीच्या बळावर स्वसमाज, स्ववंश व स्वसंस्कृति शुद्ध राखून आर्यांनीं स्वत:च्या वर्णांच्या व संकरांच्या जाति बनवून अनार्यांच्या व अनार्य संकरांच्याहि जाति बनविल्या. आपापली संस्कृति घेऊन व आपापल्या जातींत सुखानें व समाधानानें राहून, आपापली उन्नति, यथाशक्ति व यथावकाश करीत रहावें, असा शिलशिला आर्यांनीं घालून दिला

— इतिहाससंशोधक वि. का. राजवाडे

( हिंदूसमाजांत हिंद्वितरांचा समावेश )








प्रा. दि. धों. कर्वे

# आजीव सदस्यसंस्था व लोकशाही

[ " नवभारता "च्या जुलै १९५७च्या अंकांत प्रा. अ. भि. शहा व प्रा. ग. प्र. प्रधान यांचा " आजीव सदस्यसंस्था व लोकशाही " या मथळयाखालीं एक लेख प्रसिद्ध झाला आहे. कोणत्याहि विशिष्ट शिक्षणसंस्थेची टीका करणें हा त्या लेखाचा उद्देश नव्हता; यामुळेंच त्यास नवभारतांत स्थान देण्यांत आलें. तथापि प्रा. शहा व प्रा. प्रधान हे दोघेहि फर्ग्युसन कॉलेजांत कायम सेवक असल्यानें त्या संस्थेसंबंधींच लेखांतील विधानें करण्यांत आलीं असावींत असा गैरसमज होण्याचा संभव आहे ही गोष्ट फर्ग्यूसन कॉलेजचे प्राचार्य दि. धों. कर्वे यांनीं आमच्या नजरेस आणली याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोंत. हा गैरसमज दूर व्हावा व प्रस्तुत प्रश्नाची दुसरी बाजू वाचकांसमोर यावी यासाठीं प्राचार्य कर्वे यांनीं प्रस्तुत लेख लिहिला आहे. का. सं. ]

" नवभारत " च्या जुलै १९५७ च्या अंकांत प्रा. शाह व प्रा. प्रधान यांचा वरील विषयांवर एक लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यांतील कांहीं थोडया भागाशीं मी सहमत असलों तरी पुष्कळशा बाबतींत प्राध्यापकद्वयांचा व माझा तीव्र मतभेद आहे. त्यांतूनहि हे दोघे प्राध्यापक ज्या महाविद्यालयांत कायमसेवक म्हणून काम करीत आहेत त्याच महाविद्यालयाचा प्रमुख म्हणून मी १९४६ पासून काम करीत आहे; एवढेंच नव्हे तर तें महाविद्यालय व इतर दहा-बारा संस्था चालविणाऱ्या डेक्कन एज्युकेशन सोसायटीचा गेलीं ३१ वर्षें आजीव सदस्य आहे. अर्थातच कायम सेवकांची बाजू जनतेच्या व सूज्ञांच्या पुढें मांडण्याचें, त्याचप्रमाणें आजीव सदस्य संस्थेची विफलता विशद करून सांगण्याचें काम त्यांनीं आपल्याकडून ज्याप्रमाणें केलें त्याचप्रमाणें आजीव सदस्यसंस्था अजूनहि उपयुक्त काम कसें करीत आहे व कायम सेवकांच्या मनांत वैफल्य आणि कडवटपणा येण्याचें कांहीं विशेष कारण नाहीं हें माझें मत सकारण व स्पष्टपणें पुढें मांडणें हें मी माझें कर्तव्य समजतों.

## सर्व संस्था एकाच प्रकारच्या नव्हेत

लेखाच्या सुरुवातीस कांहीं गोष्टी स्पष्ट करणें जरूर आहे. आजीव सदस्यांकडून चालविल्या जाणाऱ्या संस्थांचा प्रारंभ महाराष्ट्रांत डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या स्थापनेपासून ( १८८५ ) झाला. त्यानंतर त्या धर्तीवर अनेक निरनिराळया संस्था निघाल्या. शाह – प्रधान जरी अशा प्रकारच्या सर्व संस्थांबद्दलचा विचार एकत्रच करीत आहेत तरी माझ्या माहितीप्रमाणें अशा प्रकारच्या संस्थांत अनेक महत्त्वाचे फरक आहेत. हे फरक केवळ संघटना, नियम, नोकरीच्या अटी ह्यांतच आहेत असें नाहीं तर ह्या संस्थांचीं जीं सर्वोच्च नियामक मंडळें आहेत त्यांच्या घटनेंतहि महत्त्वाचे फरक आहेत. शाह-प्रधान ह्यांनीं ज्या " लोकशाही " च्या दृष्टिकोनांतून ह्या प्रश्नाचा विचार केला आहे त्या प्रश्नाची एक बाजू त्यांच्या नजरेंतून अजिबात सुटलेली आहे. संस्थांना आर्थिक साहाय्य देणारे जे लोक असतात त्यांचे प्रतिनिधी विशिष्ट प्रमाणांत असलेलीं नियामक मंडळें बहुतेक सर्व संस्थांतून असतात. डेक्कन एज्युकेशन सोसायटीमध्यें तीन आजीव सदस्य आणि पांच देणगीदारांचे प्रतिनिधि अशा आठ जणांचें नियामक मंडळ असतें व त्याच्यावर आजीव सदस्यांच्या संख्येइतकेच देणगीदारांनीं नेमलेले प्रतिनिधि असलेलें कौन्सिल असतें. संस्थांचा दैनंदिन कारभार जरी आजीव सदस्य पहात असले तरी सर्व महत्त्वाचे प्रश्न ह्या नियामक मंडळांकडूनच ठरविले जातात. इतर शिक्षणसंस्थांतहि अशाच प्रकारची व्यवस्था असते. ही व्यवस्था लोकशाहीचा व्यापक अर्थ लक्षांत घेऊनच












योजलेली आहे. संस्थेत प्रत्यक्ष काम करणारे आजीव-सदस्य व संस्थेला आर्थिक साहाय्य करणारे देणगीदार ह्यांच्या सहकार्यावरच संस्थांची उभारणी असते व त्या दोहोंनाहि संस्थांच्या कारभारांत स्थान असतें.

आजीव सदस्यपद्धति आतां निरुपयोगी झालेली आहे व तिच्या जागीं सर्व शिक्षकांनीं निवडलेलें कारभार-मंडळ अधिकारावर यावें असें शाह-प्रधान यांचें म्हणणें आहे. महाराष्ट्रांत ज्या शिक्षणसंस्था आज शिक्षणाचें कार्य करीत आहेत त्यांत तीन प्रकारच्या संस्थांचा निर्देश करतां येईल. एक सरकारी संस्था. ह्यांत एक प्रमुख नेमलेला असून त्याला दैनंदिन कारभारांत बराच अधिकार असतो. मात्र नोकरीच्या अटी, पगार इत्यादि सरकारकडून परस्पर ठरविलेल्या असतात व शिक्षकांच्या नेमणुकाहि सरकारी यंत्रणेकडून केल्या जातात. दुसऱ्या प्रकारच्या संस्था एखाद्या नियामक मंडळानें नोकरीवर ठेवलेल्या सेवकांच्या. येथेंहि सेवकांना कारभारांत स्थान नसतें व त्यांच्यांत आजीव सदस्य व कायम सेवक असा भेद नसतो. सर्वच नियामक-मंडळाचे नोकर म्हणून काम करतात व संस्था-प्रमुखच दैनंदिन कारभार पाहतो. बहुधा संस्था-प्रमुख नियामक-मंडळाचा सभासद असतो—पण तें आजीव सदस्य म्हणून नव्हे तर प्रमुख म्हणून. ह्या दोन प्रकारच्या संस्था शैक्षणिक दृष्ट्या आजीव सदस्यांच्या संस्थांपेक्षां कांहीं विशेष चांगल्या प्रकारचें काम करतात किंवा त्या संस्थांतून जास्त चांगले विद्यार्थी बाहेर पडतात असें म्हणतां येणार नाहीं. सरकारी संस्थांना पैशाचा पुरवठा जास्त असून देखील तेथें शिक्षणाचा दर्जा आजीव-सदस्यांच्या संस्थांइतकाच असतो. तेव्हां आजीव-सदस्यांच्या पद्धतीचें कार्य आतां संपलेलें आहे असें म्हणतांना दुसऱ्या कांहीं प्रकारच्या संस्था अधिक चांगल्या आहेत असें दाखविण्याची जबाबदारी टाळतां येणार नाहीं. सर्वच संस्था जर दुय्यम दर्जाच्या असतील तर मग त्याचा दोष बाह्य परिस्थितींत असला पाहिजे. एवढेंच नव्हे तर आजन्म-सेवकांच्या संस्था जर त्यांतल्या त्यांत बऱ्या असतील तर मग त्या पद्धतीला अगदीं टाकाऊ म्हणतां येणार नाहीं. अर्थात त्या पद्धतींतील दोष काढून टाकून तिच्यांत सुधारणा करावयास कोणचीच हरकत नाहीं.

### विषमतेचा प्रश्न

शाह—प्रधान यांचा मुख्य दावा असा आहे कीं, आजन्म-सदस्य व कायम-सेवक यांच्या नोकरीच्या अटींत "असमर्थनीय विषमता" आहे व ती काढली पाहिजे. मात्र शैक्षणिक पात्रतेमुळें जी विषमता येईल ती मान्य करावयास शाह-प्रधान तयार आहेत. ह्या बाबतींत मी फक्त माझ्या संस्थेबद्दलचाच विचार करणार आहे. इतर संस्थांची मला फारच थोडी माहिती आहे व त्यांच्याबद्दलचा विचार करणें मला शक्य होणार नाहीं. फार काय विषमतेबद्दलचा जो तपशील शाह-प्रधान ह्यांनीं आपल्या लेखांत दिला आहे त्यावरून त्यांनींहि इतर संस्थांच्या बद्दलचा विचार केलेला आहे असें वाटत नाहीं.

हिंदुस्थानांतल्याच काय, पण परदेशांतहि कोणतीहि शिक्षणसंस्था घेतली तरी तेथें शिक्षकांमध्यें उच्चनीच श्रेणी असतेच. एक मुख्य प्राध्यापक ( विषयाचा प्रमुख ) इतर कांहीं साधे प्राध्यापक, कांहीं दुय्यम प्राध्यापक, कांहीं लेक्चरर, कांहीं ट्यूटर किंवा डेमॉन्स्ट्रेटर अशा पायऱ्या सगळीकडेच असतात. तशाच त्या आजीव सदस्यांनीं चालविलेल्या संस्थांतहि असतातच. आमच्या संस्थेंतील प्रथमपासूनचें धोरण असें आहे कीं आजीव सदस्य हे प्राध्यापकाच्या दर्जाचे असावे आणि म्हणून आजीव सदस्यांची संख्या कांहीं प्रमाणांत जरूर असलेल्या प्राध्यापकांच्या संख्येवरून ठरविली जाते. ह्याचा परिणाम असा होतो कीं, क्वचित् एखादा चांगल्या शैक्षणिक पात्रतेचा तरूण मनुष्य ज्यावेळीं










संस्थेंत प्रथम नोकरींत येतो त्या वेळीं प्राध्यापकाची जागा मोकळी नसते ( म्हणजे त्याच्या विषयांत पुरेसे प्राध्यापक आधींच घेतलेले असतात. ) व त्याला दुय्यम प्राध्यापकाची किंवा लेक्चररची जागा देण्यांत येते. ही पद्धति बदलणें शक्य झालें तर शाह–प्रधान ह्यांच्याप्रमाणें मलाहि आनंदच होईल पण तें शक्य होईल असें वाटत नाहीं.

## आजीवसदस्य घेण्याची पद्धत

फर्ग्युसन महाविद्यालयांतील सर्वसाधारण पद्धति अशी आहे कीं जेथें जेथें एखाद्या विषयांत प्राध्यापकाची कायम जरूरी असेल तेथें शक्य तर आजीव सदस्यच घेण्याचा प्रयत्न करावयाचा. अर्थात् जेथें दुय्यम प्राध्यापक अगर त्याखालची जागा असेल तेथें त्या त्या स्थानास योग्य अशा व्यक्तीची निवड करून तिचें काम चांगलें होतें असें आढळून आल्यानंतर तिला कायम सेवक नेमण्याबद्दल नियामक मंडळाकडे शिफारस करावयाची. कांहीं अगदींच थोडे अपवाद सोडले तर बहुतेक सर्व आजीव सदस्य वयाच्या तिसाव्या-वर्षाच्या आंतच संस्थेंत काम करावयास लागून आजीव सदस्य म्हणून स्वीकारले जातात.

१ प्रथम नेमणुकीच्या वेळीं प्राध्यापकाची जागा मोकळी नसल्यामुळें अगर पुरेशी शैक्षणिक पात्रता नसल्यामुळें ज्या शिक्षकांची प्रथम नेमणूक दुय्यम जागेवर होते व ते त्यानंतर चढत चढत प्राध्यापक होतात त्यांना आजन्म सदस्य होता येत नाहीं. अशा बहुतेक शिक्षकांचें वय प्राध्यापकपदाला पोंचण्याच्या सुमारास तिसाच्या पुढें गेलेलें असतें.

२. कांहीं शिक्षक ज्या वेळीं डे. ए. सोसायटीच्या महाविद्यालयांत येतात त्यावेळीं इतर ठिकाणीं नोकरी करून नंतर आले असल्यामुळें त्यांचें वय अधिक झालेलें असतें आणि त्यांची नेमणूक जरी एकदम प्राध्यापकपदावर झाली तरी त्यांना कायम सेवक म्हणून राहावें लागतें. आजीव सदस्य होता येत नाहीं.

उत्तम शैक्षणिक पात्रता असलेला, आजीव सदस्य होऊं इच्छिणारा ( म्हणजे आमच्याच संस्थेंत काम करण्याचें ज्यानें ठाम ठरविलें आहे असा ) व प्राध्यापक-पदावर नेमला गेलेला शिक्षक वयानें फार अधीक नसेल तर आजीव-सदस्य म्हणूनच घेतला जातो असें म्हणतां येईल. पूर्वी तर कॉलेजांतील सर्व प्राध्यापक आजीव सदस्यच असत व केवळ एखादा शास्त्री किंवा मुनशी एवढेच कायम-सेवक असत. पुढें पुढें कॉलेजांतील विद्यार्थ्यांची व वर्गांची संख्या वाढूं लागल्यावर एकंदर शिक्षकांची संख्याहि वाढली आणि प्राध्यापकांच्या जोडीला दुय्यम प्राध्यापक, लेक्चरर इत्यादि श्रेणींतहि बरीच शिक्षकमंडळी आली. सर्व प्राध्यापक शक्य तर आजीव सदस्य असावे असें आमच्या संस्थेचें धोरण आहे व त्यामुळेंच फर्ग्युसन कॉलेजांतील एकंदर २७ प्राध्यापकांपैकीं १५ आजीव सदस्य आहेत व ११ कायम सेवक आहेत. ह्या कायम सेवकांपैकीं बहुतेक सर्व प्रथम दुय्यम प्राध्यापक म्हणून लागलेले व यथावकाश चढत गेलेले किंवा प्राध्यापक म्हणून नेमणूक होतांना जास्त वयाचे होते. कांहीं एक-दोघांचें नांव आजीव सदस्य म्हणून सुचविण्यांत आलें होतें, पण ती सूचना मान्य करण्यांत आली नाहीं; तरीहि त्यांना बहुतेक आजीव सदस्यांच्याच नोकरीच्या अटी देण्यांत येऊन कायम-सेवक म्हणून घेण्यांत आलें. वरील सर्व गोष्टींचा विचार केल्यावर वाचकांस असें दिसून येईल कीं निदान माझ्या संस्थेंत तरी आजीव सदस्यांची सरासरी ( Average ) शैक्षणिक पातळी कायम-सेवकांच्या सरासरी पातळीपेक्षां जास्त आहे. तसेंच आजीव सदस्यांच्या शैक्षणिक पातळीच्या लोकांना सरकारी किंवा तत्सम नोकरींत जो पगार व नोकरीच्या ज्या अटी मिळाल्या असत्या त्या लक्षांत घेतां त्यांनीं आजीव सदस्यत्व स्वीकारतांना अजीबात त्याग केलेला नाहीं असें म्हणणें धाष्ट्याचें होईल. आज








सरकारी कॉलेज-शिक्षकांच्या ज्या तीन श्रेणी आहेत त्यांतल्या मध्यम ( class B ) श्रेणीचाहि पगार २५० पासून ६५० पर्यंत असतो आणि त्यांना पेन्शन वगैरे सर्व सवलती असतात. आजीव सदस्य निदान सरकारी बी-क्लास शिक्षकांइतक्या शैक्षणिक पातळीचे खासच असतात–त्यांतील कांहीं तर सर्वो-च्च श्रेणीमध्यें जाण्याइतकेहि श्रेष्ठ असतात. तेव्हां आजीव-सदस्यांचे पगार वगैरे नोकरीच्या अटी भरमसाट फायद्याच्या आहेत व त्यांनीं मुळींच त्याग केलेला नाहीं हें म्हणणें मान्य होण्यासारखें नाहीं. आतां कायम सेवकांपैकीं कांहीं थोडे आजीव सद-स्यांच्या इतक्याच शैक्षणिक पात्रतेचे असतील हें मी नाकारीत नाहीं पण वर दिलेल्या कारणांमुळें ते आजीव सदस्य होऊं शकले नाहींत आणि कायम सेवक म्हणूनच राहिले.

## नोकरीच्या अटी व सवलतींचा प्रश्न

आजीव सदस्यांच्या नोकरीच्या अटी व त्यांना मिळणाऱ्या सवलती ( विमा, मुलांचें फुकट शिक्षण इ. ) डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या स्थापनेपासून जवळ जवळ मुळींच बदललेल्या नाहींत. ( फक्त सुमारें ३० वर्षांपूर्वी प्रॉव्हिडंड फंडाची जादा सवलत सुरू झाली ) त्यावेळींच आजीवसदस्य व कायम-सेवक ह्यांच्या नोकरीच्या अटी व सवलती ह्यांत थोडाफार फरक करण्यांत आलेला होता. ( आजीव सदस्यांच्या बायकामुलांना विमा, २० वर्षें नोकरीनंतर पगाराच्या निम्में पेन्शन; कायम सेवकांना विमा नाहीं, २० वर्षांनंतर पगाराच्या एक तृतीयांश पेन्शन व ३० वर्षांनंतर निम्में पेन्शन इत्यादि ) तो आपटे-आगरकर-गोखले यांच्या वेळेपासूनच आहे. शाह-प्रधान यांच्या लेखावरून कोणाचा जर असा समज झाला असेल कीं हे फरक आतांच्या आजीव सदस्यांनीं केलेले आहेत तर तें बरोबर नाहीं. ज्यांची सरासरी शैक्षणिक पात्रता उच्च आहे त्यांना थोड्या जास्त चांगल्या अटी व ज्यांची सरासरी शैक्षणिक पात्रता कमी त्यांना कमी चांगल्या अटी अशा तत्त्वावरच तो फरक केलेला होता. येथें आणखी एका गोष्टीचा खुलासा केला पाहिजे. प्रथम डेक्कन एज्युकेशन सोसायटी एक शाळा व एक कॉलेज चालवीत असे. त्या वेळीं कॉलेजांतील सर्व प्राध्यापक व शाळेचे प्रमुख हे आजीव सदस्य असत आणि दुय्यम शिक्षक, कारकून, शिपाई हे सर्व कांहीं कायम सेवक आणि कांहीं तापुरते सेवक असे असत. त्यांची संख्या मर्यादित असे. पुढेंपुढें संस्थांची संख्याहि वाढली व त्यांतील विद्यार्थ्यांची संख्याहि वाढली त्यामुळें आजीव सदस्याच्या संख्येपेक्षां कितीतरी मोठी वाढ कायम सेवकांच्या संख्येंत झाली. उदाहरणार्थ, १८८५–९० च्या वेळीं आजीव सदस्य १०–१२ असत ते आज ३० पर्यंत आहेत. पण कायम सेवक जे पूर्वी २५–३० होते ते आज ३००–४०० झालेले आहेत. ( हे आकडे सर्व डे. ए. सोसायटीबद्दलचे आहेत. ) सरकारी धोरणामुळें ग्रँटचें प्रमाण कमी झाल्यामुळें व देणग्यांचा ओघहि जवळ जवळ आटल्यामुळें संस्थांची सांपत्तिक स्थिति अत्यंत असमाधानकारक झालेली आहे. त्यामुळें १९४९ पासून कायम सेवकांना पेन्शनची सवलत बंद करावी लागली. ही गोष्ट चांगली झाली नाहीं व शक्य तर कायम सेवकांना पेन्शनची सवलत मिळावी असें माझें मत आहे. अर्थात् त्याच वेळेपासून आजीव सदस्यांचें पेन्शनहि बंद करतां आलें असतें पण त्यामुळें फक्त समता ठेवतां आली असती एव-ढेंच. कायम सेवकांना पेन्शनची तरतूद करण्याची शक्यता मात्र नव्हती. ज्यांना पेन्शनची सवलत आहे त्यांना प्रॉव्हिडंड फंड जरा कमी दरानें मिळावा व ज्यांना पेन्शनची सवलत नाहीं त्यांना तो जरा जास्त दरानें मिळावा एवढी गोष्ट मात्र करण्यांत आली आहे. नोकरीच्या अटी व सवलती ह्यांतील फरक नाहींसा करतां आला तर अवश्य करावा ह्याच मताचा मी आहे हें स्पष्टपणें सांगावेसें वाटतें अर्थात् गुणकर्म-विभागशः जे फरक असतील ते राहाणारच.










फर्ग्यूसन कॉलेजांतील
एकंदर सेवकांबद्दलची माहिती
( सन १९५६ – ५७ )

| | कायम | हंगामी | एकूण |
|---|---|---|---|
| आजीव सदस्य | १५ | — | १५ |
| प्राध्यापक | १२* | — | १२ |
| दुय्यम प्राध्यापक | ६ | — | ६ |
| लेक्चरर | ८ | ३ | ११ |
| ट्यूटर व डेमॉन्स्ट्रेटर | १९ | २४ | ४३ |
| कारकून वगैरे | १७ | ३ | २० |
| शिपाई | ७९ | १३ | ९२ |
| एकूण | १५६ | ४३ | १९९ |

* हे सर्व ( १ ) प्रथम खालच्या श्रेणींत नेमलेले व यथावकाश चढत चढत वयाच्या ३० व्या वर्षानंतर प्राध्यापक पदाला चढलेले, किंवा ( २ ) ज्यांचीं नांवें आजीव सदस्यपदाकरितां सुचविलीं होतीं पण मान्य झालीं नाहींत ( असे फक्त २ च ह्या प्राध्यापकांत आहेत ), किंवा ( ३ ) जे प्रथम ह्या कॉलेजांत आले त्यावेळींचें त्यांचें वय अधिक झालेले असे आहेत.

[ फर्ग्युसन कॉलेजचें उदाहरण घेतलें तर असें दिसून येईल कीं आजीव सदस्यांची संख्या पंधरा आणि कायम सेवकांची १४०च्या आसपास. १५५ च्या पेन्शनची तरतूद करतां आली असती तर उत्तमच. पण तें अशक्य झाल्यामुळें १५५ ची ती सवलत काढावयाची कीं १४० ची असाच तो प्रश्न होता. सर्व १५५ ची काढली असती तर १४० ना मानसिक समाधान लाभलें असतें एवढेंच. ]

## विषमतेचे इतर प्रकार

आतां नोकरीच्या अटी सोडून नेहमींच्या व्यवहारांतल्या इतर प्रकारच्या विषमतेबद्दल शाह-प्रधान ह्यांनीं जो उल्लेख केला आहे त्याबाबत विचार केला पाहिजे.

१. वाचनालयांत आजीव सदस्यांकरितां स्वतंत्र जागा व इतरांना नाहीं हें विधान वाडिया लायब्ररीला तरी लागूं नाहीं.

२. वाचनालयाकरितां विकत घ्यावयाचीं पुस्तकें विषयाचा मुख्य ठरवितो. तो आजीव सदस्य आहे कीं नाहीं ह्या गोष्टीला महत्त्व नाहीं. ज्या विषयांचे प्रमुख कायम शिक्षक असतात त्यांनीं शिफारस केलेलीं पुस्तकेंहि विनतक्रार विकत घेतलीं जातात. अर्थात् प्रत्येक विषयाचीं पुस्तकें किती मर्यादेपर्यंत घ्यावयाचीं हें बजेटवरून ठरतें. त्यांत आजीव सदस्य ज्यांचे प्रमुख आहेत असे विषय व कायम शिक्षक ज्यांचे प्रमुख आहेत ते विषय असा भेद केला जात नाहीं. कांहीं आजीव सदस्यहि विषयांचे प्रमुख नसल्यामुळें त्यांनांहि पुस्तकें घेण्याबद्दल परस्पर शिफारस करतां येत नाहीं व त्यांना विषयप्रमुखांमार्फतच ही शिफारस पाठवावी लागते. पण होतां होईतों कोणत्याहि शिक्षकानें शिफारस केलेलीं पुस्तकें घ्यावयाचीं असेंच धोरण असतें.

३. बहुतेक विषयांचे प्रमुख आजीव सदस्यच आहेत. ह्याचें कारण वर दिलेलेंच आहे, कीं होतां होईतों प्राध्यापकपदावर नेमणूक करतांना योग्य पात्रतेचा व वयाचा शिक्षक मिळाल्यास आजीव सदस्यच घ्यावा असें आमच्या संस्थेचें धोरण आहे. अर्थात् बहुतेक विषयांत आजीव सदस्य हेंच सर्वांत् श्रेष्ठ (पात्रतेनें व, किंवा अनुभवानें ) असतात. ज्यावेळीं निरनिराळया वर्गांवरील कामाची वाटणी होते तेव्हां साहजीकच विषयप्रमुखाला वरच्या वर्गाचें काम व इतरांना थोडें वरच्या वर्गांचें व थोडें खालच्या वर्गांचें अशी विभागणी होते. खालच्या वर्गांत मुलें जास्त असतात त्यामुळें त्या वर्गांना शिकविणाऱ्या शिक्षकांना उत्तरपत्रिका तपासण्याचें काम पडतें हें खरें, पण ती विभागणी विषय-प्रमुख व सहकारी शिक्षक ह्यामुळें होते, आजीव सदस्य आणि कायम शिक्षक ह्या तत्त्वावर केली जात नाहीं.

४. विद्यापीठाचे पर्यवेक्षक जणू काय आजीव सदस्यांकडून नेमले जातात असा शाह–प्रधानांच्या म्हणण्याचा आशय दिसतो. त्यांचें विधान सपशेल चुकीचें व गैरसमज निर्माण करणारें आहे. विद्या-









पीठाच्या परीक्षांकरितां उच्च पर्यवेक्षक व दुय्यम पर्यवेक्षक ह्यांच्या नेमणुकांकरितां शिफारस करण्याचें काम फक्त कॉलेजच्या प्राचार्यांचें असतें व निदान गेल्या दहा वर्षांबद्दल मी असें म्हणूं शकेन कीं प्राध्यापक, दुय्यम प्राध्यापक व लेक्चरर ह्यांच्या सेवाकालाच्या अनुक्रमानेंच मी त्यांच्या नांवाची यादी विद्यापीठाला पाठवितो. तेथेंहि रजिस्ट्रार ज्या व्यक्तींची नियुक्ति पर्यवेक्षक म्हणून करतांत त्यांत विद्यापीठाची कार्यकारिणीसुद्धां कांहीं फरक करीत नाहीं. माझ्या कॉलेजांतील दीर्घ सेवा केलेले पुष्कळसे कायमशिक्षक विद्यापीठाच्या परीक्षांना तसेंच सेकंडरी स्कूल परीक्षेला सवेतन पर्यवेक्षक नेमले जातात हें मला ठाऊक आहे. अर्थातच सवेतन पर्यवेक्षकांच्या नेमणुकांत आजीव सदस्यांचीच वर्णी लागते किंवा आजीव सदस्यांना त्या बाबतींत पक्षपात करण्याचा कांहीं विशेष अधिकार असतो असें भासविण्याचा शाह-प्रधान यांचा जो प्रयत्न आहे तो सत्यावर आधारलेला नाहीं.

५. कॉलेजच्या आवारांतील घरांचीं भाडीं बाहेरच्या भाड्यांपेक्षां पुष्कळच कमी आहेत व आजीव सदस्यांबरोबरच आजीव सदस्य नसलेल्या अनेक कायम सेवकांना फर्ग्यूसन कॉलेजांत राहाण्यास जागा दिलेल्या आहेत. ह्या कायम सेवकांत प्राध्यापकांपासून शिपायांपर्यंत सर्वांची शक्य तो सोय केलेली आहे. आजीव सदस्यांपैकीं पुष्कळसे विशिष्ट प्रकारचें काम करतात ( दुय्यम प्राचार्य, वसतिगृहांचे पर्यवेक्षक, इमारती व रस्ते ह्यांच्या दुरुस्तीचें काम पाहणारे इ० ) व त्यांना इतरांपेक्षां आधीं घरें देण्यांत येतात. कायम सेवकांपैकींहि वसतिगृहाचे डॉक्टर, लायब्ररीचे व्यवस्थापक, प्रयोगशालांतील शिपाई ह्यांना अगोदर पसंति दिली जाते व उरलेलीं घरें इतरांना दिलीं जातात. डेमॉन्स्ट्रेटरांना देखील प्रकृति किंवा इतर कौटुंबिक कारणें असतील तर घरें देण्याचा प्रयत्न केला जातो. एकदां घर दिलें कीं तें निदान तीन वर्षें काढून घेतलें जात नाहीं व त्यानंतरहि सोडावयास लावावयाचें तर त्याला पुरेशी आगाऊ सूचना देण्यांत येते. आजीव सदस्याची बदली झाल्यामुळें एका कायम सेवकाला घर सोडावें लागल्याची जी हकीगत शाह-प्रधान ह्यांनीं दिली आहे तीबद्दल एवढेंच म्हणावयाचें कीं त्या कायम सेवकाच्या कुटुंबांत फक्त एक व्यक्ती ( ते स्वतः ) असून त्यांना कॉलेजच्या आवारांतच दुसरें लहान घर देण्यांत आलें आहे व नव्या आजीव सदस्याच्या कुटुंबांत ५-६ माणसें असल्यामुळें त्याला मोठें घर देण्यांत आलें आहे.

६. शिस्तभंग किंवा अकार्यक्षमता ह्यांबद्दल कायम सेवकांच्या बाबत केव्हांहि चौकशी करण्याचा किंवा निर्णय घेण्याचा जेव्हां प्रश्न येतो तेव्हां अखेरीस नियामक-मंडळालाच काय तो अधिकार असतो. " फिर्यादी, न्यायदेवता व शिक्षेची अंमलबजावणी हे तिघे एकाच व्यक्तींत किंवा व्यक्तिसमूहांत दृग्गोचर पडतात. " हें शाह-प्रधानांचें वाक्य सपशेल चुकीचें आहे. अशा प्रत्येक प्रसंगीं प्रथम गुन्ह्याचें अथवा चुकीचें स्वरूप त्या त्या व्यक्तीला कळविलें जातें, त्या व्यक्तीचें लेखी म्हणणें मागविलें जातें व नंतर नियामक मंडळाकडून त्या प्रकरणाचा अखेर निकाल केला जातो. नियामक मंडळांत आजीव सदस्यांबरोबरच संख्येनें त्यांच्या पेक्षां अधिक असे देणगीदारांचे-पर्यायानें समाजाचे-प्रतिनिधी असतात हें विसरून चालणार नाहीं. शिस्तभंग, अकार्यक्षमता इत्यादीबद्दलचे नियम आजीव सदस्य धरून सर्वांना सारखेच असतात. आजीव सदस्यांना वेगळे किंवा जास्त सौम्य नियम नाहींत.

वरील विवेचनावरून असें दिसून येईल कीं विषमतेबद्दलचा जो तपशील शाह-प्रधान ह्यांनीं दिला आहे तो पुष्कळ बाबतींत निदान माझ्या संस्थेबद्दल तरी गैरलागू आहे व ज्या बाबतींत ( उदा० १९४९ नंतरच्या कायम सेवकांना पेन्शन नसणें, इ० ) तो लागू आहे त्यांतील कांहीं बाब-








तींत ती विषमता दीर्घ सेवा, विषयप्रमुखाचें स्थान, उच्च शैक्षणिक पात्रता ह्यामुळें झालेली असते. कांहीं प्रकारची विषमता दूर करावयास पाहिजे असें माझें वैयक्तिक मत आहे पण तें संस्थांच्या सांपत्तिक परिस्थितीमुळें अंमलांत येऊं शकेल कीं नाहीं त्याबद्दल शंका वाटते. राज्यसरकार, केंद्र सरकार किंवा युनिव्हर्सिटी ग्रँट्स् कमिशन ह्यांच्या मदतीनें जर महाविद्यालयांतील सर्व शिक्षकांच्या व इतर सेवकांच्या वेतनांत वाढ करून नोकरीच्या अटी अधीक चांगल्या करणें शक्य झालें तर मला आनंदच होईल. त्याकरतां माझ्याकडून होईल ती खटपट मी करीत आहे. पण अद्याप तरी यश मिळण्याचीं चिन्हें नाहींत; कारण भारतांतील ८०० कॉलेजांचा हा प्रश्न आहे व कोटयवधी रुपये उपलब्ध केल्याखेरीज तो सुटणार नाहीं.

## राजकीय लोकशाहीच्या कल्पनेची अप्रस्तुतता

शिक्षणसंस्थांतील आजीवसदस्य सर्वच सद्गुणांचे पुतळे आहेत व सर्व कायम-सेवक वाईट आहेत असा माझा आशय नाहीं. दोन्ही वर्गांत चांगले, वाईट, मध्यम असे सर्व प्रकारचे लोक आहेत. एकदां आजीव सदस्य म्हणून संस्थेंत प्रवेश मिळाला कीं मग विद्याभ्यासंग करण्याची धडपड कमी होऊन केवळ वर्षानुवर्षे शिकवीत राहावयाचें असे आजीव सदस्य मुळींच नाहींत असें मी म्हणत नाहीं. पण एकदां कायम झाल्यावर कमींत कमी जेवढें काम करणें जरूरच असेल तेवढें करावयाचें; प्रत्येक वेळीं प्रत्यक्ष शिकविण्याच्या कामाव्यतिरिक्त जरा कांहीं काम आपल्या वांट्याला आलें कीं कुरकूर करायची ( उदा० कॉलेजांतील परीक्षांचे वेळीं पर्यवेक्षक म्हणून काम आलें कीं रजेच्या चिठ्ठया पाठविणें अगर निष्काळजीपणें उशीरां जावयाचें ), असे कायमसेवकहि असतात. मुख्य मुद्दा असा कीं आजीव-सदस्यपद्धति बंद करावी व सर्व सेवकांनीं निवडलेल्या मंडळींनीं संस्थांचा कारभार पहावा असें सुचवितांना शाह–प्रधान ह्यांनीं ह्या प्रश्नाचा पुरेसा विचार केलेला आहे असें वाटत नाहीं. (ते दोघे कायम शिक्षक असल्यामुळें ?) सर्व शिक्षकांनीं तें कारभार-मंडळ निवडावें असें ते लिहितात; पण लोकशाही राजकीय अर्थानें जर शिक्षण-संस्थांत आणावयाची असेल तर मग सर्व कायम सेवकांना ( शिपाई-कारकून इत्यादि धरून ) ते हा अधिकार कां देत नाहींत हें कळणें कठीण आहे. सरासरीनें आजीव-सदस्यांची शैक्षणिक पात्रता जर अधिक असेल ( व तशी ती आहे असें मला वाटतें ) तर त्यांना कांहीं विशेष अधिकार व सवलती असण्यांत कांहीं गैर आहे असें नाहीं. जास्त चांगल्या पात्रतेचे व जास्त कार्यक्षम असे आजीव-सदस्य मिळाले तर संस्था आजच्या पेक्षांहि अधिक चांगलें काम करतील. टिळक-आगरकर-गोखले यांच्या तोडीचे आजीवसदस्य आज शिक्षणसंस्थांत नाहींत हें जरी सत्य असलें तरी त्यांच्या तोडीचे लोक इतर सार्वजनिक क्षेत्रांतहि दुर्मिळच आहेत हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे. कदाचित सर्व समाजाचीच स्थिति अशी असेल कीं तींतून उत्तम प्रकारचे कार्यकर्ते पुरेसे उपलब्ध होत नसतील. शाह-प्रधान ह्यांनीं इतर क्षेत्रांत किंवा इतर प्रकारच्या शिक्षणसंस्थांत उत्तम प्रकारचे कार्यक्षम लोक असून केवळ ते आजीवसदस्यांच्या संस्थांतच येत नाहींत असें दाखविलें असतें तर त्यांच्या म्हणण्याला कांहीं जोर आला असता. तसा कांहीं प्रकार नाहीं. त्यामुळें त्यांनीं आजीव-सदस्य-पद्धतीच्या निरुपयोगीपणाबद्दल जीं विधानें केलीं आहेत तीं वस्तुनिष्ठ नसून वैयक्तिक मतें आहेत असें म्हणणें भाग पडतें. अर्थात् आजीव सदस्यांनीं चालविलेल्या संस्थांनीं आजपर्यंत काय कार्य केलें, त्यांची सांपत्तिक स्थिति आज कशी आहे, ती पद्धति चालू ठेवावी, बंद करावी कीं बदलावी, त्यांत कायम सेवकांचें स्थान काय असावें इत्यादि प्रश्नांचा जर एखाद्या निःपक्षपाती समितीकडून विचार झाला तर मला फारच आनंद होईल. कारण ह्या प्रश्नांशीं मुख्य संबंध समाजाचाच आहे व समाजनेत्यांनीं तो सोडविण्याचा प्रयत्न केल्यास तें स्वागतार्हच होईल.











## पत्रव्यवहार

[ श्री. नाईक यांच्या प्रतिपादनांतील मुख्य मुद्दा त्यांनीं म्हटल्याप्रमाणें बाजूस पडून गेल्या मार्चच्या अंकांतील " क्ष " आणि जुलैच्या अंकांतील प्रा. शाह व प्रा. प्रधान यांच्या लेखामुळें " आजीव सदस्य पद्धतीची इष्टानिष्टता " या बहुतांशीं स्वतंत्र मुद्याच्या चर्चेस आरंभ झाला आहे. वरील लेखकांचें प्रतिपादन योग्य व समर्थनीय आहे असें म्हणणारीं कांहीं वाचकांचीं पत्रेंहि 'नवभारता'कडे आलीं आहेत. तथापि आपलें नांव छापूं नये अशी इच्छा, या ना त्या कारणास्तव, या पत्रलेखकांनीं व्यक्त केल्या कारणानें हीं पत्रें प्रसिद्ध करतां येत नाहींत. प्रस्तुत विषयाची दुसरी बाजू म्हणून या अंकांत पुण्यांतील फर्ग्युसन कॉलेजचे प्राचार्य दि. धों. कर्वे यांचा लेख प्रसिद्ध होत आहे. – का. सं. ]

संपादक 'नवभारत' यांस

'नवभारता'च्या फेब्रुवारी १९५७ च्या अंकांत माझा " जीवनदान आणि सामाजिक बदल " या नांवाखालीं एक लेख आला होता. नंतरच्या कांहीं अंकांतून माझ्या लेखांतल्या कांहीं विचाराबाबत चर्चा झालेली आहे. विशेषत: शिक्षणसंस्थेंतल्या आजीव सदस्यपद्धतिबद्दल मी जे विचार मांडले होते त्याबद्दल ही चर्चा आहे. सदर बाबतींत माझ्या मुद्याच्या स्पष्टीकरणार्थ मी कांहीं विचार मांडूं इच्छितों.

भूदानासारख्या, यशासाठीं समाज-स्वरूपावर सर्वस्वी अवलंबून असलेल्या, आणि स्व-जीवन-मूल्यहि बाह्य परिणामात्मक असलेल्या चळवळींमध्यें जीवनदान पद्धति ही बुद्धिप्रामाण्यरहित ठरूं शकेल; तर यशासाठीं आपल्याच संस्थेच्या अंतर्गत कार्यक्षमतेवर अवलंबून असलेल्या, आणि स्व-जीवन-मूल्यहि स्व-संवेद्य असलेल्या शिक्षणसंस्थेमध्यें हल्लीं रूढ असलेली आजीवसदस्य पद्धति ही, आजीव सदस्याच्या जीवनमूल्यामध्यें बदल होण्याची शक्यता नसल्यामुळें, सदोष ठरूं शकत नाहीं. असे विचार मी " जीवनदान आणि सामाजिक बदल " ( फेब्रुवारी १९५७ ) या माझ्या लेखामध्यें व्यक्त केले होते. माझ्या लेखाचा, किंवा त्या विशिष्ट मुद्याचा, उद्देश शिक्षणसंस्थेमधल्या आजीवसदस्य पद्धतीचा बरे-वाईटपणा ठरविणें किंवा आज अस्तित्वांत झालेल्या तिच्या स्वरूपावर चर्चा करणें हा नव्हता. 'क्ष'च्या समजुतीप्रमाणें ( 'नवभारत' मार्च १९५७ ) आजीवसदस्य पद्धतीची भरमसाठ स्तुति करणें आणि इतरांची निंदा करणें असा तर माझ्या मनांत चुकूनसुद्धां विचार नव्हता.

या बाबतचे माझे विचार इतकेच कीं, जीवनदात्या व्यतिरिक्त इतरांच्या कार्यामुळें आपल्या भोंवतालच्या सामाजिक जगतामध्यें परिणामकारक बदल होण्यासारखें जर आपले कार्यक्षेत्र असेल, तर अशा कार्यासाठीं जीवनदान करणें हें बुद्धिप्रामाण्यरहित आहे. शिक्षणसंस्थेमध्यें एके काळीं तरी आजीव-सदस्य पद्धति उपयोगी पडली याचें मुख्य कारण असें कीं, आजीव सदस्यांच्या विचारामध्यें आणि ध्येयामध्यें बदल घडवून आणण्यासारखें सामाजिक जीवन त्यांच्या सभोंवतीं नव्हतें. आजच्या आजीव सभासदांचें ध्येयच जर वेगळें असेल, त्या मागचे हेतू आणि प्रेरणाच जर वेगळी असेल, तर तो दोष आज रूढ असलेल्या आजीव-सदस्य पद्धतीचा आहे; " त्यांच्या ध्येयांत सहसा बदल घडवून आणण्यासारखी परिस्थिति बाह्य जगतामध्यें नसते " या विचाराचा नाहीं.

— जिनेंद्र नाईक

# ५·४१ टक्के प्राप्तिकरापासून मुक्त

नवीं
१२-वर्षीय
नॅशनल प्लॅन
सेव्हिंग्ज्
सर्टिफिकेटें
खरेदी करा व त्यावर
प्राप्तिकरापासून मुक्त असलेलें ५.४१
टक्के व्याज मिळवा

तुम्ही गुंतविलेल्या
प्रत्येक १०० रुपयामागें
१२ वर्षानंतर १९५ रुपयें
हातीं येतात ही सर्टिफिकेटें
पोस्ट ऑफिसातून
मिळूं शकतात.

**तुमची बचत आतां अधिक लाभ तुम्हाला मिळवून देते.**

**१०-वर्षीय ट्रेझरी सेव्हिंग्ज**
**डिपॉझिट सर्टिफिकेटांवर**

मुदतीनंतर कर-मुक्त ४ टक्के व्याज
दरसाल हातीं येतें. व्याजाची रक्कम
दरसाल तुम्हांला दिली जातें.

**पोस्ट ऑफिस**
**सेव्हिंग्ज बँक**
**डिपॉझिटस्**

व्याजाचा दर दरसाल
२-१/२ टक्के.

## नॅशनल सेव्हिंग्ज् ऑर्गनायझेशन

DA—57/62 MAR

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई